# प्रस्तावना

महाराष्ट्रभाषासुंदरीची सर्वांगीण सेवा महाराष्ट्रीय साहित्यिकांनीं कित्येक वर्षांपूर्वी सुरू केली, आणि ललित–ललितेतर अशा निरनिराळ्या स्वरूपाच्या एकाहून एक वैभवशाली लेण्यांनीं तिला सजवून तिच्या सौंदर्यांत भर घातली. ललित विभागांत कादंबऱ्या, प्रहसनें, गोष्टी, गुज-गोष्टी, विनोदी लेख, कविता, गीतें, भावगीतें, नाटकें, नाटिका, रूपक-कथा आणि नाट्यछटा अशा बहुविध बाबतींत आमच्या साहित्यिकांनीं इतकी प्रशंसनीय कामगिरी केली आहे कीं, मराठी भाषेला प्राप्त झालेली मातब्बरी भारतवर्षांतील इतर कोठल्याहि भाषेला प्राप्त झाली नसेल. महाराष्ट्रवाङ्मयभक्तांच्या या बहुविध वाङ्मयसेवेचा अभिमान कोणता महाराष्ट्रीय धरणार नाहीं ?

परंतु 'आत्मचरित्र' नांवाचा जो एक लेखनप्रकार आहे त्यांत मात्र आमच्या साहित्यिकांनीं अद्याप फारशी भर घातलेली नाहीं. आत्मचरित्रा-मुळें निर्माण होणारें वाङ्मय जितकें सहृदय आणि हृदयंगम असूं शकतें—जितकें प्रत्यक्ष आणि संवेदनाशील असूं शकतें, तितकें कदाचित् दुसरें कोणतेंच वाङ्मय असूं शकणार नाहीं. असें असूनहि गेल्या अनेक संवत्सरांचा आढावा घेतला तर इतर वाङ्मय–प्रकारांच्या मानानें फारच थोडीं अशीं आत्म-चरित्रें मराठींत प्रसिद्ध झालीं आहेत असें दिसून येईल. आमच्या महा-राष्ट्रांत निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत अनेक थोर व्यक्ती उज्ज्वल कार्य करीत आहेत. या व्यक्तींनीं आपापलें आत्मचरित्र लिहून ते प्रसिद्ध करण्याचें मनांत आणलें तर आमची 'मराठी मायबोली' आत्मचरित्राच्या या विभागांतहि खचित् संपन्न होईल. एखादा मनुष्य अगदीं सामान्य प्रकारचें आयुष्य कां कंठित असेना पण त्यानें आपल्या जीविताचें "सत्य, स्वाभाविक आणि सुंदर" आत्मवृत्त लिहिलें तर तें एखाद्या ललितकृती-पेक्षां अधिक मनोरंजक (आणि मार्गदर्शकहि) ठरेल, असे उद्गार एका इंग्रज लेखकानें काढले आहेत ते मला सत्य वाटतात. त्या दृष्टीनें आत्म-चरित्र लेखनाचा जो पायंडा आमच्या साहित्यिकांनीं व कलावंतांनीं पाडला आहे तो स्वागतार्हच समजला पाहिजे.

स्वतःची जीवनकथा लिहावयाची ती " सत्य, स्वाभाविक आणि सुंदर " मात्र असावी. म्हणूनच जें सत्य नाहीं तें स्वाभाविक नसल्यामुळें सुंदरहि असणार नाहीं ही गोष्ट मात्र प्रत्येक आत्मचरित्रकारानें पूर्णपणें ध्यानांत ठेविली पाहिजे. वाटेल त्या " आडनांवानें " जरी आत्मचरित्र लिहिलें तरी आत्मकथनाच्या ओघांत लेखकाच्या हातून आत्मपूजनाचा सोहळाहि साजरा होण्याचा संभव असतो. आत्मश्लाघेचें देवदेवक ठेवल्याशिवाय आत्मचरित्राचें मंगलकार्य त्याला सहसा पार पाडतांच येत नाहीं. अशा प्रकारचें आत्मवृत्त लिहिणारा लेखक स्वतःशीं इतका समरस झालेला असतो कीं, सत्यसृष्टीच्या साम्राज्याची सीमा उल्लंघन करून मनोराज्याच्या हद्दींत पाऊल टाकल्याची त्याला दखलहि नसते. आत्मकथनाच्या हेतूनें मनोराज्याच्या मायावी सृष्टींत संचार करणाऱ्या लेखकाभोंवतीं त्याच्या स्वतःच्याच प्रतिमा आत्मश्लाघेचे चाळ बांधून तालबद्ध नृत्य करूं लागतात, आणि त्या नृत्याच्या मंजुळ झंकारांत तो लेखक पूर्णपणें तल्लीन होतो. स्वतःशीं समरस होण्यांत जी मादक निशा आहे ती निशा मद्यांतहि नसते; आणि म्हणूनच कोणाहि आत्मचरित्रकारानें त्या निशेच्या आधीन होऊन आपला "तोल" जाऊं नये, अशी खबरदारी घेणें अगत्याचें असतें. आत्मचरित्रांत बेताची आत्मश्लाघा प्रतिबिंबित झाली तर ती प्रसंगविशेषीं ( क्षम्य नसली तरी ) उपेक्षणीय ठरेल ! पण अनिवार्य आणि अप्रामाणिक आत्मश्लाघेला परनिंदेची जोड मिळूं लागली तर अशा प्रकारच्या किळसवाण्या आत्मचरित्रांचा वेळींच खरपूस समाचार घेऊन हीं आत्मचरित्रें लिहिणाऱ्या दांभिक व्यक्तींच्या तात्कालिक प्रतिष्ठेची पर्वा न करतां त्यांचें सत्यस्वरूप उघडकीस आणलेंच पाहिजे, असें माझें मत आहे.

कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांतील एक प्राध्यापक ना. सी. फडके यांनीं " माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति " या कर्णमधुर आणि सोज्वळ " आडनांवा " च्या आडोशाखालीं लिहिलेलें आत्मचरित्र " झंकार " मध्यें क्रमशः प्रसिद्ध होत असतांनाच, मला असें आढळून आलें कीं, या प्राध्यापक महाशयांनीं सत्याऐवजीं सत्यापलापावरच जास्त भर देऊन या आत्मचरित्राची सजावट केली आहे. इतकेंच नव्हे, तर आत्मश्लाघेची

कमालमर्यादा ओलांडून अनुपेक्षणीय औद्धत्यानें त्यांनीं परनिंदेच्या प्रांतांतहि बेगुमानपणें संचार केला आहे. आत्मश्लाघा आणि परनिंदा अशा दोन आघाड्या उघडून अलौकिकत्वाचा दुर्ग काबीज करण्याचा अट्टाहास या प्राध्यापक महाशयांनीं दाखवला आहे. अन्यायी, थिल्लर आणि कंपूप्रधान साहित्यिकांच्या मेळाव्यांतच नव्हे, तर कमकुवत, बेशिस्त आणि दांभिक राजकारणपटूंच्या घोळक्यांत आपणच काय ते एक निष्कलंक वृत्तीचे प्रतिभासंपन्न साहित्यिक आणि निधड्या छातीचे तत्त्वनिष्ठ राजकारणधुरंधर होतों असा आभास निर्माण करण्याचा हीन प्रयत्न त्यांनीं केला आहे.

प्रोफेसर मजकुरांचें ढोंग उघडकीस आणण्यासाठीं त्यांनीं लिहिलेल्या आत्मश्लाघापर आत्मचरित्रांतील फक्त दोनच ढोबळशा कल्पित कथांवर लगुडप्रहार करण्याचें मीं ठरवलें. इ. स. १९३२ सालीं उत्पन्न झालेला आणि 'प्रतिभासाधनसामिती' च्या निःपक्षपाती निर्णयानें लवकरच निकालांत निघालेला 'प्रतिभासाधन' वाद आणि १९२१ सालीं या अहंमन्य गृहस्थांनीं 'केसरी' संस्थेंतून आणि "देशाच्या राजकारणांतून" केलेला पोबारा हे दोनच प्रसंग मीं त्याकरतां निवडले आहेत.

या दोन्ही घटनांचें वृत्त लिहितांना या आधुनिक "स्मृतिकारांनीं" स्वतःच्या स्मृतींशीं आणि सदसद्विवेकबुद्धींशीं प्रतारणा करून सत्याची कशी गळचेपी केली आहे, त्या घटनांशीं संबंध आलेल्या निरानिराळ्या व्यक्तींवर गलिच्छ निंदेची चिखलफेंक कशी केली आहे आणि आत्मश्लाघेची अनिवार हौस कशी भागवून घेतली आहे, हेंच वाचकांच्या दृष्टोत्पत्तीस आणून तें मी सप्रमाण सिद्ध करणार आहे.

नारायण सीताराम फडके या व्यक्तीशीं माझा जसा स्नेहसंबंध नाहीं तसें त्या व्यक्तीशीं माझें वैरहि नाहीं. 'न मे द्वेष्योस्ति न प्रियः' हीच भावना या व्यक्तीबद्दल मीं माझ्या मनांत बाळगली आहे. आतांपर्यंत मी त्यांच्याशीं अवघीं शंभर वाक्येंहि बोललों नसेन. या व्यक्तीच्या सहवासांत मी कधींच नव्हतों आणि या व्यक्तीचा आणि आपला निकट परिचय व्हावा असें मला कधीं वाटलेंहि नाहीं. नारोपंतांचे आणि माझे मार्ग भिन्न-सर्वस्वीं भिन्न असल्यामुळें माझी भूमिका एकाद्या त्रयस्थासारखी आहे. म्हणूनच त्यांच्या अवखळ "स्मृति" मागें दडून बसलेल्या विस्मृतींचा आविष्कार

करून या दांभिक माणसाचं सत्यस्वरूप उघडकीस आणण्याची मला मुळींच दिक्कत वाटत नाहीं.

एका अहंमन्य साहित्यिकाचा दंभस्फोट करून इतरांना तो मार्गदर्शक व्हावा म्हणून " फडके थापा मारूं नका " ही लेखमाला लिहिण्याचें मीं योजलें. मूळ लेखमाला मीं 'अधिज्यधन्वा' या टोपण नांवानें लिहिली होती. ठिकठिकाणीं झालेले पुनरुक्तिसारखे किरकोळ दोष टाळून व व्यवस्थित जुळणी करून संक्षिप्त स्वरूपांत तेच लेख मीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध करीत आहे.

ही लेखमाला प्रसिद्ध करण्याचें धैर्य ज्यांनीं दाखविलें त्या 'विविध-वृत्ता' च्या संपादकांचा, उपसंपादकांचा आणि "वृत्तां"त प्रसिद्ध झालेली ही लेखमाला ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्याचें कार्य ज्यांनीं निर्भयपणें अंगावर घेतलें, त्या य. गो जोश्यांचा, त्याचप्रमाणें ही लेखमाला लिहीत असतां पदोपदीं ज्यांनीं प्रोत्साहन देऊन मला अनेक प्रकारांनीं मदत केली त्या सर्व मित्रमंडळींचा मी सदैव आभारी आहें.

मिरज मेडिकल सेंटर
२५ एप्रिल १९४४

# अनुक्रमणिका.

# प्रतिभालांछन

**म्हणजेच**

साहित्यनिर्मितीसाठीं आवश्यक असणारी प्रतिभा संपुष्टांत आल्यावर स्वतःच्या "साहित्यसेवेंतील स्मृति" ची कर्मकहाणी सांगतांना एका अहंमन्य साहित्यिक-ब्रुवानें जाणून बुजून केलेल्या लांछनास्पद थापेबाजीचें सडेतोड आविष्करण !

" विविधवृत्त " कार

श्री. रामचंद्र काशिनाथ तटणीस

यांस

लेखकाकडून अर्पण.

# प्रतिभा-लांछन

## पुरलेल्या हाडांचे फांसे : : १

> " It is not so. It cannot be true. Don't tell that story again. You cannot think how poor a figure you make in telling it"
>
> —Dr. Johnson.

अहंकाराच्या उन्मादानें मनुष्य एकदां बरळूं लागला, म्हणजे त्याच्या तोंडून कोणतीं मुक्ताफळें बाहेर पडतील याचा नेम नसतो. मद्यप्राशनामुळें चढलेला कैफ आणि अहंकारामुळें उत्पन्न झालेला उन्माद यांच्या बाह्य लक्षणांत बरेंचसें साम्य असलें, तरी त्या दोहोंत बराच फरक असतो. मद्याचा अंश रक्तांत शिल्लक असेपर्यंतच मद्यप्याच्या माकडचेष्टा चालू

असतात; पण अहंकाराचा आवेग हाडा-मांसांत कायमचा मुरत असल्या-मुळें अहंकाराच्या उन्मादानें पछाडलेल्या माणसाच्या माकडचेष्टा अव्या-हतपणें जन्मभर चालू असतात. याचें नमुनेदार उदाहरण म्हणजे श्री. नारोपंत फडके हे होत ! 'मिया मूठभर अन् दाढी हातभर' या म्हणीच्या जोडीला, ' मूर्ति टीचभर पण गुर्मी वांवभर ' अशी दुसरी एक म्हण या गृहस्थांच्या चढेल वृत्तीला अनुलक्षून सुचवावीशी वाटतें. हे गृहस्थ नुसते चढेल आहेत इतकेंच नव्हे, तर अस्सल थापाडे आणि पट्टीचे कांगाव-खोरहि आहेत. अनेक लटपटीखटपटींनीं मिळवलेल्या भोजराज बक्षिसाचा उन्माद चढल्यामुळें जर हा मनुष्य सदोदित घोड्यावर चढून बोलतो, तर 'नोबेल प्राइझ'सारखें विलोभनीय बक्षीस महाराष्ट्राच्या आणि मराठी भाषेच्या दुर्दैवानें या माणसाच्या वांट्याला आलें असतें, तर त्यानें काय केलें असतें कुणाला ठाऊक ! देवेंद्राजवळ त्याच्या ऐरावताची मागणी करण्याइतपतसुद्धां या माणसाच्या उन्मत्तपणाची मजल पोहोंचली असती !

आत्मप्रसिद्धिप्रीत्यर्थ प्रसिद्धिलोलुप जिवाणू ज्या ज्या तंत्रांचें सामान्यतः अव-लंबन करीत असतात, तीं सर्व तंत्रें आत्मसात् करूनहि आपल्या अपेक्षेप्रमाणें आपल्याला प्रसिद्धि प्राप्त झाली नाहीं, इतकेंच नव्हे, तर मध्यंतरींच्या काळांत जो थोडाफार भाव साहित्यक्षेत्रांत आपण कमावला होता, तोहि अत्रे नामक एका खट्याळ माणसानें, आपल्या आयुष्यांतील निरनिराळ्या 'लीलांवर' स्वच्छ प्रकाश पाडून पार उतरवून टाकला; आजपर्यंत इतक्या अजीजीनें आपण आपल्या नांवावर चढवलेली जिल्हई त्या आडदांड माणसानें पार नाहींशी करून टाकली; इतका खटाटोप करून साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदापर्यंत आपण आपली अब्रू पोहोंचवली, पण या " नवयुगीन " दुःशासनानें तेथून ती फरपटत ओढीत नेऊन तिला सर्व संभावित साहित्यिकांसमक्ष विवस्त्र करून टाकली, हें शल्य फडक्यांच्या मनांत एकसारखें डांचत होतें. आणि म्हणूनच, आपल्या नांवावर नवी जिल्हई चढवण्याकरितां स्वतः-च्याच " झंकार " नामक साप्ताहिकांत, "माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति" ही लेखमाला लिहून, आणि ती पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचा घाट घालून, पर्यायानें तिला अक्षर (!) वाङ्मयांत अढळ स्थान मिळवून देण्याचा चंग फडक्यांनीं बांधला !

पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, आपल्या साहित्यस्मृतींच्या ताजमहालाचें बांधकाम करतांना फडक्यांनीं चुना म्हणून बेशक चिखल वापरला. सत्यकथा सांगण्याचा आव आणून चक्क थापा मारल्या ! 'कलंकित मुखप्रक्षालन सिद्धयर्थं' आरंभलेल्या अनुष्ठानाचें उदक सोडून साहित्य-सेवेंतील स्मृतींची स्मरणी ओढीत बसलेल्या या महंतांनीं जपाचें पुण्यकर्म करण्याऐवजीं थापांची आणि शिव्याशापांची हौस भागवून घेतली. देवी सरस्वतीच्या डोक्यावर मोरचेलें ढाळण्याच्या मिषानें शारदामंदिरांत घुसलेला हा दांभिक साहित्यसेवक शारदेच्या मोराचीं पिसें उपटीत बसला आहे, हेंच मला शारदाभक्तांच्या दृष्टोत्पत्तीला आणावयाचें आहे.

दहा वर्षांपूर्वीं प्रतिभासाधन समितीनें अखेरचा निर्णय देऊन त्या वेळीं वृत्तपत्रांतून गाजलेला 'प्रतिभासाधन वाद' व्यवस्थितपणें निकालांत काढला होता, ही गोष्ट पुष्कळांच्या स्मरणांत असेलच. 'महाराष्ट्र साहित्य-मंदिर' या संस्थेनें नेमलेल्या 'प्रतिभासाधन समिती'चे अध्यक्ष प्रो. दत्तोपंत पोतदार यांच्या सहीनें या समितीचा निर्णयात्मक अहवाल १९३३ सालीं प्रसिद्ध होऊन तो वाद कायमचा निकालांत निघाला ! हा निर्णया-त्मक अहवाल प्रसिद्ध झाल्यानंतर नारोपंत फडक्यांनीं त्या निर्णयाबद्दल जाहीररीत्या एक अवाक्षरहि कोठें उच्चारलें नाहीं, किंवा लिहिलें नाहीं. यावरून एकच गोष्ट सिद्ध होते ती अशी कीं, आरंभीं आरंभीं वावदूक-त्वाची बरीचशी राळ उडवून 'जितं मया'च्या डरकाळ्या फोडीत दशदिशा दणाणून सोडणाऱ्या फडक्यांनाहि तो निर्णय मान्य होता.

असें असूनहि दहा वर्षांनंतर महाराष्ट्रीय वाचकांची स्मरणशक्ति अधू झाली असेल, किंवा आपल्या विधानाविरुद्ध एके काळीं उपलब्ध असलेला पुरावा सप्तपाताळांत गाडला गेला असेल या भ्रमानें फडक्यांनीं प्रतिभा-साधनाचा हा जुना वाद पुनः उकरून काढला आणि त्याचें स्पष्ट स्वरूप विद्रूप करून तें वाचकांसमोर मांडलें. असें करण्यांत त्यांचा एक अंतस्थ हेतु होता. वाटेल तशी हातचलाखी करून स्वतःच्या साहित्यसेवेचें स्वरूप अत्यंत उज्ज्वल असल्याचा आभास निर्माण करून जातां जातां 'प्रतिभा-साधन' वादाशीं संबंध आलेल्या निरनिराळ्या विद्वानांची मनसोक्त रेवडी उडवावयाची !

हा हेतु साध्य व्हावा म्हणून प्रोफेसर महाशयांनीं ‘ प्रतिभासाधन ’ वादाचा इतिहास किती विपर्यस्त स्वरूपांत लिहिला आहे तें त्यांच्याच शब्दांत उध्दृत करणें इष्ट आहे.

प्रोफेसरसाहेब म्हणतात, “ त्या वेळीं गो. गो. अधिकारी नांवाचे एक गृहस्थ पुण्यांत होते. आतां ते कुठें आहेत देव जाणे ! हे गृहस्थ त्या वेळीं ‘ महाराष्ट्र साहित्य-मंडळ ’ या संस्थेचे चिटणीस होते......जो वाद खरं पाहिलं असतां मी व कानिटकर यांमधला होता, तो अधिकारी व त्यांचे पित्ते यांनीं आपल्या हातीं घेतला व ‘महाराष्ट्र साहित्य-मंदिरा’चे चिटणीस या नात्यानें अधिकारी यांनीं एक जाहीर सभा बोलवली. कशासाठीं ? तर प्रतिभासाधन वादावरील निर्णय घेण्यासाठीं. पुण्याच्या लोकांना तमाशा हवा होता. अधिकाऱ्यांनीं ती व्यवस्था केली.....अधिकाऱ्यांना जलसा करायचा होता, पण न्यायाचं नाटकहि करायचं होतं. म्हणून त्यांच्या जाहीर सभेला कानिटकर, कुळकर्णी व मी अशा तिघांनींहि हजर राहावं, म्हणून त्यांनीं आमंत्रणें पाठवलीं...पुण्याचे चार लोक जाहीर सभा भरवीत असले, तर करीनात ते सभेची गंमत ! मीं त्या सभेपुढें हजर राहावं इतकी त्या सभेची योग्यता खचित नाहीं. मीं अधिकाऱ्यांना कळवलं कीं, सभेला हजर राहण्याची माझी इच्छा नाहीं. पण याबद्दल पुन्हां विचार केल्यावर माझा बेत बदलावा असं मला वाटूं लागलं.... सभेला हजर राहण्याचं मीं ठरवलं. मात्र अधिकाऱ्यांना तशी सूचना मीं दिली नाहीं...पुण्याच्या इतिहास-संशोधन-मंडळाच्या इमारतींत सभा भरावयाची होती. सभेच्या वेळीं इतिहास संशोधन-मंदिराच्या मुख्य दारापाशीं मी मोटरींतून खालीं उतरलों.

“ मला पाहतांच अधिकारी व इतर कांहीं लोकांचे चेहरे पाहण्यासारखे झाले...मला पाहिल्याबरोबर प्रथम अधिकाऱ्यांचा चेहरा पडला होता, तो बहुतेक अशा विचारानें कीं, आम्ही या सभेंत मन मानेल त्याप्रमाणें यथेच्छ बोलून घेणार होतों, त्यांत ही ब्याद कशाला आली ?.... अधिकाऱ्यांच्या या चेहरेपालटाचें मला आश्चर्य वाटलें नाहीं.... कांहीं तरी निमित्तानें त्यांना लोकांपुढें नाचायचें होतें. मनाप्रमाणें नाचायला मिळाल्यावर बारसं आणि बारावं या दोन्ही गोष्टी सारख्याच मानण्याइतके

हे गृहस्थ तयार होते. . . .थोड्यांच वेळांत सभा सुरू झाली. मला नक्की आठवत नाहीं; परंतु मला वाटतें प्रो. पोतदार यांची अध्यक्षस्थानीं योजना झाली... सभेपुढें भाषण करून माझ्यावरील आरोपाचा पूर्वपक्ष मांडायला कोणीच तयार होईना. कानिटकर चूप राहिले; भोरचे कुलकर्णी उठेनात आणि ज्यांनीं पूर्वी ज्ञानप्रकाशांत आपल्या लेखण्या चालवल्या होत्या, ती इतर मंडळीहि फक्त आपापसांत कुजबुजत राहिली...श्रोत्यांनीं टाळ्या वाजवल्या...मी बोलूं लागलों...'आजच्या या सभेला पांच-सातशें लोक हजर आहेत. ' ....अशा प्रकारें प्रस्ताव करून मीं अडीच तास भाषण केलें....परंतु मी भाषण संपवून खालीं बसलों व 'कुणास कांहीं बोलावयाचें असल्यास त्यांनीं बोलावें ' अशी अध्यक्षांनीं सूचना केली; त्याबरोबर अत्रे स्वयंस्फूर्तीनें उभे राहिले व उद्गारले, 'आजची ही सभा फडक्यांनीं जिंकली यांत संशय नाहीं. ' वादाचा अखेरचा निर्णय करण्यासाठीं नेमण्यांत यावयाच्या पंचांत ज्यांचें नांव होतें, त्या अत्र्यांनीं भरसभेंत असे उद्गार काढून पंचायतीच्या नेमणुकीचाच पर्यायानें निषेध करावा हें पोतदारांना साहजिकपणेंच आवडलें नाहीं, म्हणून ते लगबगीनें उठून म्हणाले, 'फडक्यांनीं सभा जिंकली वगैरे भाषा अत्र्यांनीं स्वतःपुरती व्यक्तिशः केली असें मी समजतों'. . .याप्रमाणें अत्र्यांच्या स्वयंस्फूर्त उद्गारांवर प्रो. पोतदार यांनीं निःपक्षपाती थंडाईचा बोळा जरी फिरवला, तरी माझ्या भाषणाचा श्रोत्यांवर कोणता परिणाम झाला तें मला स्पष्ट दिसलें ....माझ्या भाषणाचा लेख तयार करून ज्ञानप्रकाशांत प्रसिद्धीला दिल्यानंतर, पुढें या प्रकरणांत काडीचं लक्ष घालायचं नाहीं असं मनाशीं ठरवलं आणि त्याप्रमाणंच मी पुढं वागलों. ''

ही हकीगत वाचल्यावर सकृद्दर्शनीं एखाद्याला असें वाटेल कीं, किती साळसूद, संभावित आणि सत्यप्रिय गृहस्थ आहे हा ! किती तल्लख स्मरणशक्ति आहे या गृहस्थाची ! रानडे–टिळकांनंतर असल्या अचाट स्मरणशक्तीची दैवी देणगी कुणाच्या वांट्याला आली असेल तर ती याच गृहस्थाच्या; आणि अशा या सात्त्विक, संभावित, निरुपद्रवी आणि सत्यप्रिय गृहस्थावर या पुणेरी भामट्यांनीं कट करून काय हो गहजब केला हा !

पुण्यांतल्या या तमासगीर लोकांचें हें पाप धुऊन काढायला मुळामुठेचा संगमसुद्धां पुरा नाहीं पडायचा ! !

परंतु भरपूर पुराव्याच्या आधारावर ज्या एकाच गोष्टीबद्दल मी वाचकांची खात्री पटवून देणार आहे ती गोष्ट हीच कीं, 'प्रतिभासाधन' प्रकरणांत नारोपंतांवर परस्वापहरणाचा उघड आरोप करण्यांत आला असतां त्या आरोपाचें निराकरण विद्वानांच्या सभेसमोर करण्यांत येऊं नये; म्हणून नारोपंतांनीं अनेक गुप्त कारवाया केल्याकारणानेंच ( पुणेंकर मंडळींना तमाशा हवा होता म्हणून नव्हे ) पुणेंकर विद्वानांनीं या प्रकरणाचा पिच्छा पुरवला. ज्या सभेची योग्यता हे 'स्मृतिकार' आतां नाकारीत आहेत त्याच सभेची योग्यता त्यांनीं स्वतःच दहा वर्षांपूर्वीं असंदिग्धपणें कबूल केली होती ! सभेचा उपद्व्याप केल्याबद्दल ज्या अधिकाऱ्यांचा आज ते अत्यंत कुत्सितपणानें उल्लेख करीत आहेत त्याच अधिकाऱ्यांना, सभेचा योग जुळवून आणल्याबद्दल, फडके महाशयांनीं गौरवपर पत्र लिहून त्यांची तोंडभर प्रशंसा केली होती. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, 'फडक्यांनीं सभा जिंकली' असें आरंभीं शिफारसपत्र देणाऱ्या अध्यांशकट सर्व विद्वानांनीं 'फडके गुन्हेगार आहेत' असा एकमुखी निर्णय जाहीर करतांच या 'स्मृतिकारांचा' स्मृतिभ्रंश झाला; आणि त्या संभ्रमावस्थेंत ते वाटेल तसें बरळूं लागले. स्वतःचें डोकें ठिकाणावर ठेवून आणि प्रामाणिक बुद्धीनें फडक्यांनीं या 'प्रतिभासाधन' प्रकरणाचें निरूपण करण्याचें ठरवलें असतें, तर सभेच्या निर्णयाची साद्यंत हकीगत 'साहित्य सेवेंतील स्मृतींत' येणें अपरिहार्य होतें. पण नेमक्या त्याच महत्त्वाच्या भागाचें या 'स्मृतिकारांना' ऐन वेळीं विस्मरण झालें आहे! यापेक्षां अधिक अप्रमाणिक हातचलाखीचा मासला कोणता असूं शकेल !

'प्रतिभासाधन समिती'नें दिलेला आणि फडक्यांनीं स्वतःच्या स्मृतींतून बुद्धिपुरस्सर हद्दपार केलेला हा महत्त्वाचा निर्णय वाचकांच्या निदर्शनास मी आणणारच आहे. (परिशिष्ट 'अ' पहा.) परंतु नारोपंतांच्या 'अप्रामाणिक विस्मृती'वर 'क्ष' किरणें टाकण्यापूर्वीं 'प्रतिभासाधन' वादाची रूपरेखा स्थूलमानानें दिली तर वाचकांना या वादाची आणि

त्याबरोबरच नारोपंतांच्या हातचलाखीचीहि पूर्णपणें कल्पना येईल, म्हणून ती देणें अवश्य आहे.

( १ ) 'प्रतिभासाधन' हें पुस्तक फडक्यांनीं क्लेटन हॅमिल्टनच्या Art of Fiction या ग्रंथावर डल्ला मारून लिहिलें असा हल्ला रा. प्र. कानिटकरांनीं १४-१०-१९३२ च्या 'ज्ञानप्रकाशांत' फडक्यांवर चढवला.

( २ ) हा हल्ला परतवण्याकरतां २१-१०-३२ च्या 'ज्ञानप्रकाशांत' फडक्यांनीं एक जुजबी उत्तर दिलें. या उत्तराला २८-१०-३२ च्या 'ज्ञानप्रकाश'च्या अंकांत कानिटकरांचें प्रत्युत्तर प्रसिद्ध झालें.

( ३ ) आपली बाजू लंगडी-लुळी आहे अशी अंतस्थ खात्री असूनहि ती लोकांना चांगली जोमदार दिसावी म्हणून फडक्यांनीं २-११-३२ च्या ज्ञानप्रकाशांत कानिटकरांना तावातावानें एक आव्हान दिलें. हा वाद लवादासमोर मांडावा; जो या वादांत यशस्वी होईल त्याला 'पराजित पक्षा'नें दोनशें रुपये द्यावे, अशा स्वरूपाचें हें एक मुजोरीवजा आव्हान होतें. या आव्हानाला ५-११-३२ च्या 'ज्ञानप्रकाशां'त कानिटकरांनीं 'उघड गुन्ह्याला लवाद कशाला ?' असा प्रश्न विचारून एक वीरश्रीयुक्त उत्तर दिलें. तरी पण फडक्यांनीं काढलेल्या या लवादाच्या कल्पनेला अधिकाऱ्यांनीं ११-११-३२ च्या अंकांत पूर्णपणें पाठिंबा दिला.

( ४ ) कानिटकरांच्या भीमसेनी वीरश्रीनें चकित झालेले वाचक कानिटकरांचें मुग्ध कौतुक करण्यांत दंग झाले असतांच, एक चमत्कृतिपूर्ण रहस्य उघडकीस आलें. आपण पुरवलेल्या माहितीचा उपयोग करून आणि आपल्याला बाजूला सारून आत्मप्रसिद्धीच्या लोभानें कानिटकरांनीं हें उसनें अवसान अंगांत आणल्याचा आरोप भोरच्या कुलकर्णी नामक एका इसमानें खुद्द कानिटकरांवरच केला ! कांहीं काळ लोकांच्या कौतुकास पात्र झालेला हा वीरबाहू तोतया असून फडक्यांवर प्रहार करण्यासाठीं त्यानें मोठ्या अवसानानें उचललेली ती गदा चोरून आणलेल्या चिंध्यांपासून तयार केली आहे, या गोष्टीचा सुगावा लागतांच या वादाचें गांभीर्य कांहीं काळ नाहींसें होऊन कानिटकरांची मात्र फारच केविलवाणी अवस्था झाली. 'शिंक्याचें तुटलें आणि बोक्याचें फावलें' अशांतलाच प्रकार

झाला. या अद्भुत घटनेमुळें फडक्यांचें मात्र चांगलेंच फावलें! ते या शिंक्याखालीं टपूनच बसले होते. ‘ खरा फिर्यादी कोण तें ठरेपर्यंत उत्तर देण्याची कांहीं गरज नाहीं’ अशा स्वरूपाचा कांगावा करून ‘हा वाद सर्वस्वीं खाजगी स्वरूपाचा असल्यामुळें अधिकाऱ्यांनीं त्यांत कां लुडबुड करावी?’ अशा आशयाची एक पृच्छा त्यांनीं १५-११-३२च्या ज्ञानप्रकाशांत केली. (५) परंतु जी सभा होऊं नये अशा हेतूनें फडके ही चाळवाचाळव करीत होते ती सभा अखेर अधिकाऱ्यांच्या चिकाटीमुळें १९-११-३२ रोजीं पार पडली. अधिकाऱ्यांनीं बोलावलेल्या या ‘ अनधिकारी ’ सभेस मी हजर राहणार नाहीं असा आरंभीं आकांडतांडव करणाऱ्या फडक्यांची मजल आपण त्या सभेला हजर राहणार अशी अधिकाऱ्यांना तार करण्यापर्यंत पोंचली होती; इतकेंच नव्हे तर ती सभा ‘ न्यायसभा ’ असल्याची कबुली स्वतः फडक्यांनीं त्या सभेंत स्वतःच्याच तोंडानेंच देऊन टाकली. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे ह्या सभेचा योग जुळवून आणल्याबद्दल २१-११-३२ रोजीं कोल्हापुराहून पत्र लिहून त्यांनीं अधिकाऱ्यांचे मनःपूर्वक आभार मानले! ‘फडके गुन्हेगार आहेत.’ असा एकमुखी निर्णय देणारी ‘ प्रतिभासाधन समिती ’ याच ‘न्यायसभें’त मुक्रर करण्यांत आली. या समितींत फडक्यांनीं पूर्वी सुचवलेल्या सहा लवादांपैकीं तिघांचा समावेश करण्यांत आला होता. फडक्यांनीं सुचवलेले चौथे लवाद कै. प्रि. दा. ग. पाध्ये यांनीं सभेचें निमंत्रण नाकारतांना अधिकाऱ्यांना लिहिलेल्या पत्रांत ‘ प्रतिभासाधन ’ पुस्तकासंबंधीं स्वतःचें मत स्पष्टपणें नमूद केलें आहे.

(६) या ‘ न्यायसभे’चा अधिकृत वृत्तांत २७-११-३२ रोजीं ‘ ज्ञानप्रकाशां’त प्रसिद्ध झाला आणि फडक्यांवर परस्वापहरणाचा आरोप शाबीत होत असल्याचा एकमुखी निर्णय ‘ प्रतिभासाधनसमिती’नें जाहीर केला.

प्रतिभासाधन प्रकरणाची ही अशी थोडक्यांत पण क्रमवार हकीगत आहे. ‘ प्रतिभासाधन ’ वादाच्या हाडाचे फांसे करून ‘ नवा जुगार ’ खेळायला नारोपंत फडके सिद्ध झाले. त्यांनीं डाव टाकला; पण तो डाव अखेर त्यांच्याच अंगावर कसा उलटला हें आपण आतां पाहूं या.

---

# कच्चा वकील आणि बिलंदर आरोपी २

रा. प्र. कानिटकर हे 'प्रतिभासाधन' वादांतील प्रत्यक्ष वादी नसून कुलकर्णी नामक प्रथम पडद्याआड राहिलेल्या वादीचे वकील होते. वादीचे वकील या नात्यानें त्यांनीं नारोपंतांवर जोरदार हल्ला चढवला खरा, परंतु हा हल्ला चढवतांना त्यांनीं बरेच कच्चे दुवे ठेवल्यामुळें, हातचलाखी करण्यांत पटाईत असलेल्या प्रोफेसर महाशयांनीं मूळ वादाला बगल देऊन कानिटकरांवरच कुरघोडी करण्याचा प्रयत्न केला !

भरभक्कम पुरावा हातांत असूनहि तो पुरावा पद्धतशीरपणें मांडण्याचें कौशल्य वकिलाच्या अंगात नसल्यास कोणताहि सबळ पक्ष कसा लुलापांगळा पडतो, ही गोष्ट 'प्रतिभासाधन' वादाच्या उपन्यासांत प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येते ! 'आपली ही सभा मी न्यायसभा मानावयास तयार आहे' असे उद्गार भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या इमारतींत भरलेल्या सभेपुढें स्वतः नारोपंत फडक्यांनींच काढले असल्यामुळें, न्यायालयांतील परिभाषेचा उपयोग करून या वादाची हकीकत थोडक्यांत सांगतां येण्यासारखी आहे.

'Art of Fiction'वर दरवडा घालून क्लेटन हॅमिल्टनच्या मालकीचा कांहीं माल फडक्यांनीं आपल्या 'प्रतिभासाधन' पुस्तकांत स्वतःचा म्हणून बिनदिक्कत वापरला, या गोष्टीचा सुगावा भोरच्या भा. म. कुलकर्णी नांवाच्या एका गृहस्थांना एकाएकीं लागला ! नारोपंतांनीं गुपचुप केलेल्या या कृष्णकृत्याचा सुगावा या भालचंद्रपंतांना कसा लागला या गोष्टीशीं आपल्याला कांहींहि कर्तव्य नाहीं. हातीं आलेल्या खात्रीलायक पुराव्याचा व्यवस्थित उपयोग करून जनतेच्या न्यायासनासमोर फडक्यांविरुद्ध फिर्याद मांडण्याइतपत आत्मविश्वास किंवा मनोधैर्य अंगांत नसल्यामुळें ती फिर्याद मांडण्याचें काम कोणातरी निष्णात वकिलाच्या अंगावर सोपवण्याचा मनसुबा या भालचंद्रपंतांनीं मनाशीं मुक्रर केला ! वृत्तपत्रीय व्यवसायांत असणाऱ्या आपल्या एका दोस्ताची—रा. प्र. कानिटकर यांची—त्या महत्त्वाच्या कामीं त्यांनीं योजना केली ! कुलकर्ण्यांच्या हातून जर कोणती ढोबळ चूक झाली असेल तर ती हीच !

फिर्याद मांडतांना तंत्रदृष्ट्या कानिटकरांनीं ज्या ढोबळ चुका केल्या, त्या चुकांचा फायदा आरोपी नारोपंत फडके यांनीं घ्यायचा तेवढा घेतला आणि कानिटकरांचीं बोटें त्यांनीं कानिटकरांच्याच डोळ्यांत घातलीं. आरोपपत्रिका( charge sheet )तयार करतांना, घडलेला गुन्हा कोणत्या कलमाखालीं येऊं शकेल या गोष्टीचा कसोशीनें विचार न करतां कानिट-रांनीं भलतींच कलमें लावलीं ! आरंभीं इंडियन पीनल कोडाचें ४०३ कलम (परस्वापहरण) घालूनहि कानिटकरांनीं अखेर जो युक्तिवाद केला, तो मात्र ३७९ कलमाला (चोरी) अनुसरून ! त्यामुळें 'संशयाचा फायदा आरोपीला' या तत्त्वाचा भरपूर फायदा घेण्यासाठीं आवश्यक असलेली हातचलाखी करून फडके या कज्याळांतून कायमचे निसटूं पाहत होते. पण त्यांच्या कम-नशिबानें त्यांचा हा हेतु साध्य झाला नाहीं. गो. गो. अधिकारी यांनीं हें प्रकरण अठरा न्यायाधीशांच्या Full Bench पुढें दाखल करून घेतलें. या न्यायसभेसमोर उभें राहण्याची इच्छा आरंभीं फडक्यांना नव्हती. तरी पण मनांत नसूनहि या न्यायासनासमोर उभें राहणें त्यांना अखेर भाग पडलें ! आत्मसमर्थनार्थ फडक्यांनीं या न्यायसभेंत स्वतःच्या वावदूकत्वाचें भरपूर प्रदर्शन करून न्यायसभेला भुरळ पाडण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु या देखाव्याचा न्यायाधीशांच्या मनावर कांहींहि अंतिम परिणाम न होतां बरेच दिवस भिजत पडलेल्या या प्रकरणाचा निकाल एकमतानें (unanimously ) फडक्यांच्याच विरुद्ध झाला. न्यायसभेचे अध्यक्ष दत्तोपंत पोतदार यांच्या सहीनें या न्यायसभेचें निकालपत्रक १९३३ च्या जुलै महिन्यांत पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें आहे. ( परिशिष्ट 'अ' पहा. ) या निकालपत्रकाची भाषा इतकी तर्कशुद्ध, भारदस्त आणि निश्चयात्मक आहे, कीं तो निकाल प्रसिद्ध झाल्यावर गेलीं दहा वर्षें फडके मूग गिळून स्वस्थ बसले होते.

मूळ फिर्यादीची सुनावणी करतांना कानिटकरांच्या हातून कोण-कोणत्या चुका झाल्या, त्या चुकांचा फायदा घेऊन फडक्यांनीं वेळोवेळीं कशी हातचलाखी केली आणि या हातचलाखीमुळें मुख्य मुद्दा बाजूला राहून थोडक्यांत विझणाऱ्या वादाच्या ज्वाला पसरविण्यास खुद्द फडकेच

कसे कारणीभूत झाले, या सर्व गोष्टी नीट समजण्याकरितां कानिटकरांनीं मांडलेल्या फिर्यादींतील कांहीं भागाचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केला पाहिजे.

"हा वरच्या दर्जाचा ग्रंथ फडक्यांचा स्वतःचा नसून एका इंग्रजी ग्रंथावरून त्यांनीं तो अनुवादित केलेला आहे असें जर एखाद्याला सांगितलें तर त्याला तें खरें वाटेल का ?" अशा तऱ्हेचा कुतूहलात्मक प्रश्न विचारून त्या प्रश्नाच्या पुष्टयर्थ त्यांनीं पुढीलप्रमाणें कांहीं शेलकीं विधानें केलीं आहेत. (१) "त्या ग्रंथांतील भाषासरणी जरी त्यांची असली, त्यांनीं एखादद्दुसऱ्या ठिकाणीं आपली बुद्धिमत्ता लढवलेली असली किंवा त्यांनीं क्वचित् रचनाकौशल्य व्यक्त केलेलें असलें, तरी ग्रंथांतील विचारसंपात्ति त्यांची नसल्यामुळें फडके केवळ भाषांतरे, परपुष्ट लेखक ठरतात." (२) "ना. सी. फडके यांचा प्रतिभासाधन हा ग्रंथ क्लेटन् हॅमिल्टन नांवाच्या एका अमेरिकन ग्रंथकर्त्यानें लिहिलेल्या Art of Fiction या ग्रंथावरून अनुवादित केलेला आहे." (३) "क्लेटन हॅमिल्टनच्या Scene on the Stage व Studies in Stagecraft या पुस्तकांतील उतारे लेखकानें सादर केलेले आहेत. पण त्याच्या ज्या पुस्तकांतील विचारांच्या भांडवलावरून हें पुस्तक प्रामुख्यानें रचलें गेलें, त्या पुस्तकाचा नुसता नाममात्रहि उल्लेख नाहीं." (४) "हॅमिल्टनच्या आर्ट ऑफ फिक्शन या पुस्तकाचें नांव कोठेंहि येऊं न देण्यांत फडक्यांनीं जी खबरदारी घेतली आहे, त्यावरून ते वाङ्मयशर्विलक आहेत हें कोणालाहि सहज समजेल." (५) "प्रतिभासाधन हें पुस्तक लिहितांना Art of Fiction हें पुस्तक फडक्यांपुढें होतें, हें त्यांच्याच ग्रंथांतील पुराव्यांवरून सिद्ध होतें." (६) "प्रतिभासाधनाचा सुमारें दोनशें पानांचा जो तंत्रविभाग आहे, तो भाग हॅमिल्टनचें पुस्तक पुढें ठेवून जवळजवळ अनुवादित किंवा रूपांतरित केलेला आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं." (७) "फडक्यांनीं अशा एक का अनेक गोष्टी केलेल्या आहेत. पण त्या दाखवायच्या म्हणजे फडक्यांच्या ग्रंथाएवढाच दुसरा ग्रंथ होईल ! म्हणून त्या फंदांत न पडणेंच बरें. 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायानें वाचकांना योग्य तो बोध होईल." यानंतर Art of Fiction आणि

प्रतिभासाधन यांमध्यें जागोजाग दिसून येणारीं सुमारें सत्तावीस साम्यस्थळें त्यांनीं निदर्शनाला आणलीं आहेत.

वर दिलेल्या विधानांचा बारकाईनें विचार केला तर कांहीं विधानें एकमेकांशीं विसंगत आहेत तर कांहीं अतिव्याप्त स्वरूपाचीं आहेत, असें दिसून येईल. कानिटकरांना निश्चित असें काय सांगायचें आहे तें त्यांचें त्यांनाच नीट समजलें नाहीं, असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. सत्तावीस साम्यस्थळांचा निर्देश करून त्यांनीं फक्त तिसरें आणि पांचवें हीं दोनच विधानें पुढें मांडलीं असतीं तर फडक्यांना त्यांत बोट शिरकावयाला सुद्धां जागा सांपडली नसती. पण आरंभीं त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाचा झोक आणि त्यानंतर त्यांनीं केलेलीं पहिलीं दोन विधानें इतकाच भाग लक्षांत घेतला, तर 'प्रतिभासाधन' हें पुस्तक आमूलाग्र अनुवादित किंवा रूपांतरित असल्यामुळें स्वतंत्र ग्रंथकर्तृत्वाचें श्रेय या बाबतींत फडक्यांना मुळींच देतां येणार नाहीं, हें त्यांना सांगायचें आहे असें दिसतें. पण सहाव्या विधानांत त्यांनीं पुस्तकांतील फक्त तंत्रविभागाचाच उल्लेख केला आहे. हा उल्लेख करतांना स्वतःचा तोल गेल्याची जाणीव होऊनच कीं काय, गेलेला तोल सांवरण्याकरितां 'जवळजवळ' या शब्दप्रयोगाची एक चिंबलेली काठी त्यांनीं आयत्या वेळीं हातांत धरली आहे ! आणि सरतेशेवटीं शिता–भाताच्या न्यायाकडे बोट दाखवून व योग्य तो बोध घेण्याची जबाबदारी वाचकांवर टाकून ते मोकळे झाले आहेत ! उतावळेपणाच्या भरांत तर्कशुद्ध पद्धतीशीं काडीमोड करून कानिटकरांनीं अतिव्याप्त स्वरूपाचीं जीं विधानें केलीं, तीं सिद्ध करण्याची नसती आपत्ति त्यांनीं स्वतःच्या अंगावर ओढवून घेतली. पुस्तकांतिल विवक्षित भागासंबंधीं फडक्यांवर परस्वापहरणाचा आरोप करण्याऐवजीं सबंध पुस्तकच चोरीचा मामला आहे असें विधान त्यांनीं करून टाकलें ! कसें झालें तरी नारोपंत फडके तर्कशास्त्राचे अध्यापक, Syllogism शीं झटापटी करण्यांत आणि Dilemma चीं शिंगें उपटण्यांत त्यांनीं बरींच वर्षें खर्च केलेलीं. कानिटकरांसारख्या माणसाचा पाय कुठें आणि कसा घसरतो याची ते वाटच पाहत होते. संधि येतांच त्यांनीं कानिटकरांना

हां हां म्हणतां झुकांडी देऊन, मूळ मुद्दा बाजूला ठेवून व वादाला फांटे फोडून लोकांचें लक्ष कांहीं काळपर्यंत तरी भलतीकडेच वेधून टाकलें !

कानिटकरांनीं मांडलेल्या फिर्यादीचा लोकांच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं, असें मी मुळींच म्हणत नाहीं. ऐश्वर्याचा बराच बोलबाला झाला असल्यामुळें ज्याच्या घरींच एखादे वेळीं दरवडा पडण्याचा कमी-अधिक संभव, अशा इभ्रतदार आणि संपन्न समजल्या जाणाऱ्या माणसाच्या जामदारखान्यांतच चोरीचा माल सांपडल्याचा बोभाटा होऊन जिकडेतिकडे खळबळ उडावी तशांतलाच प्रकार फडक्यांच्याहि बाबतींत झाला, हें मात्र निःसंशय. ' प्रतिभासाधन ' पुस्तकाला भोजराज बक्षीस मिळाल्याची बातमी नुक्तीच जाहीर झाली होती. त्या पुस्तकांत संकलित केलेली सर्व विचारसंपत्ति स्वतःच्या हिंमतीवर कमावल्याची बढाई फडके मिरवीत होते. (आणि अद्यापहि मिरवीत आहेत ! ) कांहीं लोक मुक्तकंठानें फडक्यांची स्तुति करीत होते, सस्मित मुद्रेनें फडके ती स्तुति ऐकत होते—सगळें कांहीं ठीक चाललें होतें. इतक्यांत ही ' अंदरकी बात ' एकाएकीं उघडकीला आली ! ज़ी गोष्ट आपण इतक्या बेमालूम रीतीनें गुप्त ठेवण्याची खबरदारी घेतली, ती गोष्ट अशा रीतीनें उघडकीला आल्याची जाणीव होतांच फडके प्रथम बरेच बेचैन झाले.

फडक्यांच्या अंगांत प्रसिद्धि-पराङ्मुखतेची अभिजात वृत्ति असती, आणि त्यांचें स्वतःचें मन या बाबतींत सर्वस्वीं निष्पाप असतें, तर ' ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां जानन्तु ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ' असें भवभूतीच्या आत्मविश्वासानें एकच रोखठोक उत्तर देऊन ते मोकळे झाले असते. पण हें ओढून ताणून आणलेलें चंद्रबळ फार वेळ टिकणेंच शक्य नव्हतें. भोजराज बक्षिसाचे ते दोनशें रुपये जरी अद्याप हातीं पडायचे होते, तरी मानाच्या मंदिलांत अहंमन्यतेचा सव्वाहात तुरा खोवून फडके फिरत होते. अंगावर बेतलेल्या आरोपाला कांहीं उत्तर देऊन कशीबशी सारवा-सारव न केली, तर तुऱ्यासकट डोक्याचा मंदिल हिसकावला जाण्याची अपमानास्पद परिस्थिति उत्पन्न होणार होती. भद्रेश्वर दीक्षिताच्या मदतीनें अनेक कारस्थानें रचून मुंडावळ्यांसकट बोहल्यापर्यंत मजल मारल्यावर तळघरांत डांबून ठेवलेला कोदंड ऐन वेळीं उपस्थित झाल्या-

मुळें जशा भुजंगनाथाची अवस्था झाली, तशीच कदाचित् आपलीहि अवस्था होईल या विचारानें फडक्यांचें कमकुवत काळीज धडधडूं लागलें. भुजंगनाथाप्रमाणें नारोपंतांच्याहि डोळ्यांसमोर काळ्यापिवळ्या रेघा दिसूं लागल्या. म्हणून भद्रेश्वर दीक्षिताच्याच बिलंदर वृत्तीनें त्यांनीं स्वतःच्या मनाला उपदेश केला कीं, 'मना, या प्रसंगीं यत्किंचित्‌हि न डगमगतां प्रसंगावधान, गांभीर्य, धैर्य, चातुर्य, युक्ति इत्यादि सर्व आयुधें सज्ज ठेवली पाहिजेत, आणि हीं वापरूनच त्यांनीं कानिटकरांच्या पत्राला लगबगीनें उत्तर दिलें.

बावळट फिर्यादी आणि बिलंदर आरोपी असा योग जमून आल्यावर कसे गंमतीचे प्रकार घडून येनात हें फडक्यांच्या उत्तरावरून स्पष्ट दिसून येतें. 'शितावरून भाताची परीक्षा ' या न्यायाची जी ढाल कानिटकरांनीं हातांत घेतली होती, तीच ढाल त्यांच्या हातांतून हिसकावून घेऊन स्वतः वरील हल्ला परवतण्यासाठीं फडक्यांनीं ती कशी वापरली आहे हें त्यांच्या पुढील वाक्यावरून लक्षांत यतें. " आपण जीं बारा लहान शितें व तीन जाड शितें काढून दाखवलींत त्यांपलीकडे आपल्या चुलीवरच्या बुटुकलींत आणखी शेंकडों शितें असतील तर ना ? का पंधरा शितें उकरल्यानंतर आपली बुटुकली रिकामी झाली तरी नेहमींचा न्याय लागू करायचा ? ... माझ्या सर्व ग्रंथाची छाननी करून ग्रंथाला ग्रंथ आपण लिहिलात तरी तें हवेंच आहे...माझ्या प्रतिभासाधन ग्रंथांतल्या व माझ्या बाकीच्या सर्व ग्रंथांतल्या चोऱ्या चवाठ्यावर आणाव्या... माझ्या ग्रंथाचा एक बात्तिसांश भाग किंवा काय उरेल तो फडके यांच्या मालकीचा आहे, हें कबूल करण्याची पाळी आली तर मात्र आवाज बसूं देऊं नका. "

संशयावरून एखाद्याच्या घराची झडती घेऊन तीन गांठोड्यांत आणि बारा पुरचुंड्यांत मिळून सांपडलेल्या सत्तावीस वस्तु दुसऱ्याच्या मालकीच्या आहेत असें त्या माणसाच्या निदर्शनाला आणल्यावर, 'तीन गांठोड्यांतील मोठे डाग आणि बारा पुरचुंड्यांतील किरकोळ वस्तु म्हणजे एकूण पंधराच डाग चोरीचे आहेत असें दाखवून या खोलींतील बाकीचाहि माल चोरीचा आहे असेंच तुम्हांला सिद्ध करावयाचें आहे ना ? मग कराच तर तें सिद्ध.माझ्या घरांतील बाकीचा सगळा माल मी तुमच्यापुढें आणून हजर

करतों. तोहि माल चोरीचा आहे हें सिद्ध करा. माझ्या ताब्यांतील एकतीस बत्तिसांश वस्तु किंवा काय उरतील त्या माझ्या मालकीच्या आहेत हें कबूल करण्याची पाळी आली, तर मात्र आवाज बसूं देऊं नका. ' असें त्या माणसानें त्रागा करून सांगितलें, तर तें त्यांचें सांगणें कितपत सयुक्तिक दिसेल? हा हास्यास्पद युक्तिवाद फडक्यांनीं जरा आणखी पुढें रेटला असता तर त्यांनीं आत्मसमर्थनार्थ असेहि विचारलें असतें कीं, "Art of Fiction या ' टिप्पणवजा ' ( फडक्यांनींच Art of Fiction या पुस्तकाला दिलेलें हें विशेषण आहे ) पुस्तकाच्या तीन पृष्ठांतील मोठाले परिग्राफ, आणखी इतर बारा पृष्ठांतलि निरनिराळीं वाक्यें अशीं एकाच पुस्तकांतील म्हणजे जवळजवळ एकच चोरी दाखवून माझा सबंध ग्रंथ चोरीचा आहे, असेंच तुम्हांला सिद्ध करायचें आहे ना ? " फडक्यांनीं अशा प्रकारचा युक्तिवाद कसा केला नाहीं याचेंच आश्चर्य वाटतें. सत्तावीस साम्यस्थळांबाबत त्यांच्यावर परस्वापहरणाचा जो आरोप करण्यांत आला होता, त्या आरोपाचें सप्रमाण निरसन करून त्यांतून दोषमुक्त होण्याऐवजीं न केलेले आरोप गृहीत धरून ते आरोप सिद्ध करण्याबद्दल फिर्यादीलाच उलट तंबी भरायची ! दोषांतून मुक्त होण्याची ही शक्कल अजबच समजली पाहिजे !

नारोपंतांनीं चालविलेल्या या असल्या हातचलाखीला सणसणीत उत्तर न देतां कानिटकरांनीं एक जुजबी प्रत्युत्तर दिलें. " मीं जे समानार्थी उतारे दाखविले आहेत ते उतारे तुमचे स्वतःचेच आहेत असें आधीं सिद्ध करा ,' असें सांगून सविस्तर उत्तर देण्याकरितां त्यांनीं दिवाळीचा वायदा मागून घेतला. परंतु या दिवाळीच्या वायद्याचा दिवा लागण्याच्या आंतच, भोरच्या कुलकर्ण्यांनीं कानिटकरांनीं बांधलेल्या दारूच्या कोठारावर उतावळेपणानें काडी टाकून होळीचा हलकल्लोळ उडविल्यामुळें धूळफेंक करण्यासाठीं टपून बसलेल्या नारोपंत फडक्यांनीं या महोदयपर्वणीचा पुरेपूर फायदा घेतला. त्यामुळें या वादाला कादंबरीचें स्वरूप प्राप्त होऊन त्यांतील " गुंतागुंत " आणि " पेचप्रसंग " वाढूं लागले व त्याची " निरगांठ " हुडकून काढून तिची " उकल " करणें हें कार्य कानिटकरांच्या आवांक्याबाहेर आहे असें स्पष्टपणें दिसून आलें.

## " भोजराज स्टेक्स् " : : : ३

I can't write my memoirs with this typewriter.
Why not?
The capital "I" is missing—

( Key to his character—Pop)

प्रतिभासाधन वादाला फांटे फोडण्याचें दोषारोपण नारोपंत फडके आतां जरी दुसऱ्यावर करीत असले, तरी त्या सत्कृत्याला त्यांच्याच हातून प्रथम कशी सुरुवात झाली हे त्यांच्याच वर्तनावरून विशद होण्यासारखें आहे. दिवाळी झाल्यानंतर फडक्यांच्या मग्रूर उत्तराला प्रत्युत्तर देण्याचा वायदा कानिटकरांनीं मागून घेतला होता. या वायद्याची मुदत टळेपर्यंत फडक्यांनीं वाट पाहणें उचित होतें; पण तसें न करतां त्यांनीं आपलें लवादाचें तट्टू हलकेंच पुढें ढकललें. किरकोळ शरीरयष्टि असलेलें आपलें हें भीमथडी तट्टू उपलाणी स्वरूपांत आणून वादाच्या रंगणांत सोडून दिलें, तर आजूबाजूचे लोक तें उधळून लावतील अशी शंका आल्यामुळेंच कीं काय, फडक्यानीं या तट्टाच्या पाठीवर दोनशें रुपयांच्या आव्हानाचें एक खोगीरहि चढवून दिलें. लवादाची सूचना मांडतांना आणि आव्हानाची भाषा करतांना फडक्यांनीं आपले नेहमींचे हातचलाखीचे प्रयोग कसे चालू ठेवले होते हें त्यांच्या स्वतःच्याच शब्दांवरून जास्त स्पष्ट होईल. " आज घटकेस ज्यांचें वयोवृद्धत्व व ज्ञानवृद्धत्व सर्वमान्य आहे, अशा चार जबाबदार साहित्यसेवकांचें एक लवाद् नेमून ' प्रतिभासाधन ' ग्रंथ माझा आहे कीं नाहीं हें त्यांच्याकडून ठरवून घ्यावें. ग्रंथ माझा नव्हे असें ठरल्यास मी आपणांस दोनशें रुपये दंडादाखल देण्यास तयार आहे. उलट तो माझा आहे असें लवादांनीं ठरवल्यास आपण मला दोनशें रुपये दंडादाखल द्यावे. ज्ञानप्रकाशच्या संपादकांकडे रु. २०० अनामत ठेवण्यास मी तयार आहे. आपण हें माझें आव्हान स्वीकारीत असाल, तर आपण ज्ञानप्रकाशच्या संपादकांकडे रु. २०० अनामत ठेवून तसें मला कळवावें. एखाद्या ग्रंथाचें कर्तृत्व लेखकाकडे केव्हां येतें ह्याची व्याख्या लवादांनीं ठरवावी व त्या व्याख्येनुसार ' प्रतिभासाधन ' ग्रंथाचें कर्तृत्व माझ्याकडे येते कीं नाहीं

याचा त्यांनीं निर्णय द्यावा. लवादासाठीं मी खालील गृहस्थांचीं नांवें सुचवितों. (१) श्री. न. चिं. केळकर, (२) श्री. कृ. प्र. खाडिलकर, (३) श्री. बापूसाहेब आंबेकर, (४) श्री. श्री. व्यं. केतकर, (५) श्री. भा. रा. तांबे, (६) श्री. वा. म. जोशी, (७) श्री. दा. ग. पाध्ये, (८) श्री. ना. ह. आपटे व (९) श्री. वि. सी. गुर्जर. हीं सर्व नांवें कोणालाहि मान्य होतील अशींच आहेत. माझें हें आव्हान आपण स्वीकारलें व ज्ञानप्रकाशच्या संपादकांकडे आपण रु. २०० अनामत ठेवले असें कळ· तांच मी ज्ञानप्रकाशच्या संपादकांकडे माझे रु. २०० पाठवीन...आपणास एकट्यास रु. २०० अनामत भरण्याचें सामर्थ्य नसेल, तर मला नेस्तनाबूद करण्यासाठीं टपलेली...अशी जी वाङ्मयाच्या प्रेमानें रात्रंदिवस झुरणारी मंडळी आहेत, त्यांची मदत मागावी. या आव्हानाचा आपण स्वीकार करतां कीं नाहीं येवढ्याच उत्तराची आतां अपेक्षा आहे. तें टाळून आपण वादाला दुसरे फांटे फोडलेत किंवा गलिच्छ वाचाळपणा चालू ठेवलात तर आपल्या बडबडीची किंमत जाणते लोक करतील अशा भरंवशावर मी प्रत्युत्तरांत कालापव्यय न करतां स्वस्थ बसेन...' प्रतिभासाधन' हा ग्रंथ क्लेटन् हॅमिल्टनच्या Art of Fiction या एका ग्रंथाचें निवळ भाषांतर आहे हें आपलें वास्तविक या वादांतलें विधान आहे... अविचारानें केलेल्या एका आचरटपणाच्या विधानाच्या खोड्यांत आपणास पकडून वादांतून निसटण्याची माझी इच्छा नाहीं. आपलें तें विधान वाच्यार्थानें घेतलें न जातां लक्षणार्थानें घेतलें जावें अशी पोरकट मल्लिनाथी आपणास सुचणें अशक्य नाहीं. ती गृहीत धरूनच मीं या पत्रांत म्हटलें आहे, कीं प्रतिभासाधन ग्रंथाचें कर्तृत्व प्रो. फडके यांजकडे देतां येत नाहीं एवढ्या सामान्य अभिप्रायाचाच आरोप माझ्यावर आपण करीत आहांत आणि तोच खराखोटा ठरवून घ्यावा असें मी म्हणत आहे."

प्रतिपक्षावर 'पोरकट मल्लिनाथी' चा आरोप करण्याच्या भरांत खुद्द फडक्यांच्या अंगांत केवळ पोरकटपणाच कसा शिल्लक उरला आहे हें मात्र उघडकीस आल्यावाचून राहत नाहीं. 'प्रतिभासाधना' च्या कर्तृत्वाचा प्रश्न कोणीं कधींच उपस्थित केला नव्हता. प्रश्न स्वतंत्र कर्तृत्वाचा होता.

आव्हान देतांना वेळोवेळीं योजलेल्या ‘ कर्तृत्व ’ या शब्दामागें असंदिग्ध-तेच्या दृष्टीनें आवश्यक असलेला ‘ स्वतंत्र ’ हा शब्द मुद्दाम गाळून टाकून स्वतः फडक्यांनीं मात्र पोरकटपणाचें मासलेवाईक प्रदर्शन केलें आहे. ‘ तूं नापास ’ आणि ‘ तूं ना ! पास ’ अशा प्रकारचा आचरट शब्दच्छल करून आपापसांत वितंडवाद घालणाऱ्या प्राथमिक शाळांतील पोरांनाहि न शोभण्याजोगी हातचलाखी या ठिकाणीं फडक्यांनीं मुद्दाम केली आहे. लवादांमार्फत कानिटकरांच्या वतीनें निर्णय झाला, तर फडक्यांनीं त्यांना दोनशें रुपये दंडादाखल द्यायचे. पण जर का हा निर्णय फडक्यांच्या बाजूनें झाला, तर मात्र कानिटकरांनीं फडक्यांना दंडादाखल दोनशें रुपये देऊन वर त्यांची जाहीर माफी मागायची ! कशी शहाजोगपणाची अट फडक्यांनीं घातली होती ती पहा. सुदैव त्या कानिटकरांचें, कीं फडके एवढ्यावरच संतुष्ट राहिले. ‘ लवाद निर्णय तुमच्या वतीनें झाला तर दंड म्हणून नव्हे, पण केवळ दाक्षिणा म्हणून मी तुम्हांला दोनशें रुपये धर्मार्थ देईन; निर्णय माझ्या वतीनें झाला, तर मात्र तुम्ही माझी पाद्यपूजा बांधून व दंडादाखल दोनशें रुपये देऊन माझ्यापुढें तुम्ही जाहीर रीतीनें लोटांगण घातलें पाहिजे ’ अशी अट फडक्यांनीं घातली नाहीं ही फडक्यांनीं कानिटकरांवर मोठी मेहेरबानी केली असें म्हटलें पाहिजे !

दोनशें रुपयांच्या दंडाची अट घालण्याची वस्तुतः कांहींच जरूर नव्हती, आणि माफी मागण्याची ही एकांगी अट तर अगदींच हास्यास्पद होती. दंडाची अट उभयपक्षीं मान्य करण्यांत यावी ही जशी फडक्यांची इच्छाची होती, तशीच माफी मागण्याची अटहि उभयपक्षीं बंधनकारक असायला हवी होती. नारोपंत फडके हे एकाद्या शारदापीठाचे धर्मगुरु असते,आणि कानिटकर हे त्या शारदापीठांतले कोणी भालदार—चोपदार असून त्यांच्या हातून श्रींचा उपमर्द होण्याजोगें असें वर्तन घडलें असतें, तर माफीची ही एकांगी अट एक वेळ विचारार्ह तरी ठरली असती. पण या बाबतींत तसा कांहींच प्रकार नव्हता. साहित्यसेवेच्या सोज्ज्वल नांवाखालीं उदरंभरणाचा धंदा करण्याच्या मिरासदारीवर नारोपंतांचा जितका हक्क पोहोंचत होता, तितक्याच हक्कानें त्या वतनदारीचा वहिवाटवारसा कानिटकरांकडेहि येत होता. असें असतां नारोपंतांनीं ही अशी

चढेल भाषा वापरायला नको होती. ' सिंह आणि मनुष्य ' हें चित्र काढणारा चितारी मनुष्य असल्यामुळें सिंहाच्या पाठीवर मनुष्य स्वार झाला आहे असें दृश्य त्या चित्रांत दाखवलें गेलें; तेंच चित्र सिंहानें काढलें असतें, तर मनुष्याच्या छातीवर सिंह बसल्याचें दृश्य त्या चित्रांत दिसलें असतें, अशा आशयाची इसापनीतींत एक गोष्ट आहे. या गोष्टीला अनुसरून ' मी जीं प्रमाणें पुढें मांडणार आहें तीं खरी आहेत असें सिद्ध झाल्यास फडक्यांनीं रांगत रांगत येऊन भर बुधवार चौकांत माझ्या पायावर स्वतःचें नाक घासावें, जर तीं खोटीं आहेत असें ठरलें तर मी घरीं बसून मनांतल्या मनांत मोघम दिलगिरी व्यक्त करीन ' अशी अट कानिटकरांकडून पुढें करण्यांत आली असती, तर फडक्यांना काय वाटलें असतें ! ' वाङ्मयशार्विलक ' आणि ' फडकेगिरी ' या शब्दांच्या हिरव्या मिरच्या नारोपंतांच्या नाकाला जर इतक्या झोंबल्या, तर असल्या या अटीच्या लाल मिरच्यांची धुरी त्यांना कितपत मानवली असती !

थोडासा अधिक विचार केला असतां आपल्याला असेंहि दिसून येईल कीं, आत्मविश्वासाच्या सात्त्विक भावनेवर या आव्हानाची उभारणी झालेली नसून अहंमन्यतेच्या तामसी वृत्तींतूनच या मुजोरीचा उगम झाला होता. फडक्यांच्या आव्हानाला सात्त्विकपणाची बैठक असती, तर त्यांच्या भाषेंत थोडा तरी सभ्यपणा दिसून आला असता. दोनशें रुपये अनामत ठेवण्याचें सामर्थ्य कानिटकरांच्या अंगांत आहे किंवा नाहीं असा कुत्सित प्रश्न उपस्थित करून फडक्यांना आपल्या वृत्तीचें प्रदर्शन करण्याची मुळींच जरूरी पडली नसती. ज्या अर्थी फडके फक्त दोनशेंच रुपयांची भाषा करीत होते आणि अंगांत उसनें अवसान आणून कानिटकरांना दटावूं पाहात होते, त्या अर्थी मला एक निराळाच संशय येत आहे. दोनशें रुपये अनामत ठेवण्याचें सामर्थ्य त्या वेळीं स्वतः फडक्यांच्याहि अंगांत नसावें. लांबून वाट चालत येणाऱ्या भोजराज बक्षिसाची रक्कम नेमकी दोनशें रुपयांचीच असल्यामुळें त्या रकमेकडे आशाळभूतपणानें लांबवर नजर टाकूनच स्वतःच्या खिशाला खार न लावतां ही सोडत खेळण्या-साठीं फडके तयार झाले असावेत, असा माझा कयास आहे. तसें नसतें, तर दोनशें रुपयांपेक्षां जास्त असणारी कोणतीहि रक्कम अनामत ठेवण्याची

तयारी फडक्यांनीं दाखवला असती. प्रतिरक्षाला झेंपणारी अशी एखादी रक्कम असावी अशा समंजस विचारानें प्रेरित होऊन फडक्यांनीं ही रक्कम निश्चित केली असावी असें म्हणावें, तर कानिटकरांच्या ऐपतीसंबंधीं हीनोद्गार काढण्याचें त्यांना कांहींच प्रयोजन नव्हतें. किंबहुना, कानिटकर रुपये अनामत ठेवायला तयार होणार नाहींत, आणि तसें झालें म्हणजे आपोआपच आपल्या अंगाशीं येणाऱ्या या प्रकरणाचे ताबूत जागच्या जागीं थंड होऊन आपली प्रतिष्ठा कायम राहील अशीच बहुधा फडक्यांची अपेक्षा होती.

फडके-कानिटकर वादाला ज्ञानप्रकाशांतून सार्वजानिक स्वरूप प्राप्त झालें. 'प्रतिभासाधन' प्रकरणाला वितंडवादाचें स्वरूप न येतां त्याचा विद्वानांच्या सभेनें निर्णय करावा असा स्तुत्य हेतु धरून गो. गो. अधिकारी पुढें सरसावले. अधिकाऱ्यांच्या निमंत्रणामुळें जी "न्यायसभा" भरली त्याच न्यायसभेंतून 'प्रतिभासाधनसमिति'ची निर्मिती झाली. लवादाची कल्पना पुढें करतांना ज्या नऊ लवादांचीं नांवें फडक्यांनीं सुचविलीं होतीं. त्यांपैकीं आंबेकर, आपटे व गुर्जर यांचा समावेश या समितींत करण्यांत आला होता. कांहीं ना कांहीं कारणांमुळें बाकीच्या सहा जणांनीं या समितीचें सभासदत्व नाकारलें असलें तरी १४—१०—३२ पासून आजतागायत त्यांपैकीं एकाहि विद्वानानें अगर त्या न्यायसभेंतील एकाहि श्रोत्यानें 'प्रतिभासाधना'च्या बाबतींत अगर त्या सभेंतील एकाहि श्रोत्यानें फडक्यांच्या स्वतंत्र ग्रंथकर्तृत्वाचा निर्वाळा देऊन त्यांच्या बाजूनें आपलें मत जाहीर केलें नाहीं. त्या सहा विद्वानांचा पोषक अभिप्राय स्वतःच्या बाजूनें जरी फडक्यांना प्रसिद्ध करतां आला असता तरी या बहुमताच्या आधारावर फडक्यांना स्वतःच्या स्वतंत्र ग्रंथकर्तृत्वाची शेखी मिरवण्याची संवड सांपडली असती. परंतु ही गोष्ट सुद्धां घडून आली नाहीं. उलट, फडक्यांनीं लवादाकरतां ज्या ज्ञानवृद्ध आणि तपोवृद्ध अशा एका साहित्यिकाचें नांव सुचविलें होतें त्या कै. प्रिं. दा. ग. पाध्यांनीं सभेचें आमंत्रण नाकारतांना अधिकाऱ्यांना लिहिलेल्या पत्रांत 'प्रतिभासाधन' पुस्तकाबद्दल फडक्यांच्या विरुद्धच निर्णय दिला आहे. वाचकांच्या खात्री-साठीं त्या पत्रांतील महत्त्वाचा भाग उध्दृत करणें भाग आहे.

" आपलें १७–११–३२ चें पत्र पोंचलें. आमंत्रण स्वीकारून पुण्यास येण्याची बुद्धि होत नाहीं. प्रतिभासाधन हें पुस्तक मीं ब-याच काळजीनें भोजराज बक्षिसासाठीं शिफारस करण्याच्या प्रसंगीं अवलोकिलें. माझा ग्रह हें पुस्तक पुष्कळ इंग्रजी पुस्तकांतील मतें संकलित करून लिहिलें आहे, असाच झाला. मीं या पुस्तकास बक्षिस देण्याची शिफारस केली नाहीं. मला वाटतें कीं, कोणतेंहि पुस्तक आपण जर इतर ग्रंथांच्या ब-याचशा साहाय्यानें लिहिलें असेल, तर त्या सर्व ग्रंथांची यादी द्यावी हा शिष्ट मार्ग आहे. कांहीं मतें जर तशींच्या तशींच अवतृत केलीं असतील, तर प्रत्येक ठिकाणीं मूळ ग्रंथाचा निर्देश करावा. भाषांतर केलें असल्यास हें अधिकच अवश्य. हा शिष्ट मार्ग प्रो. फडक्यांनीं अंगीकारलेला दिसत नाहीं..."

आपला न. से.

(सही) दा. ग. पाध्ये.

पाध्यांनीं सुचवलेला शिष्टमार्ग फडक्यांनीं स्वीकारला नाहीं हें खरें, पण कानिटकरांनीं हल्ला चढवतांच स्वतःची चूक फडक्यांनीं प्रांजलपणें कबूल केली असती तर हा वाद २१–१०–३२ रोजींच निकालांत निघाला असतां, आणि आपण कानिटकरांना दिलेल्या आव्हानांत आपलाच नैतिक पराजय झाल्याची खात्री पटतांच फडक्यांनीं दोनशें रुपयांची रक्कम कानिटकरांकडे पोहोंचती केली असती. पण तसें न करतां स्वतःच्या अंगांतील अभिजात मग्रुरीनें फडक्यांनींच या वादाला फाटे फोडायला सुरवात केली. कानिटकरांना दोनशें रुपयांचें आव्हान देणें हा त्यापैकींच प्रकार होता. कानिटकरांनीं दिवाळीचा वायदा मागून घेतल्याकारणानें घोडा मैदान फारसें दूर नाहीं ही अंतस्थ जाणीव नारोपंतांना होती. आणि म्हणूनच त्यांनीं वाचकांचें लक्ष्य मैदानावरून उडवून "घोड्याकडे" वळवण्याचा प्रयत्न केला–दोनशें रुपयांची सोडत लावून त्यांनीं या महत्त्वाच्या वादाला घोड्यांच्या शर्यतीचें स्वरूप दिलें! पण आपण सुचवलेल्या लवादमंडळाला 'रेसकोर्स'वरील निर्णायकांचें ( umpires ) स्वरूप प्राप्त होईल हा सारासार विचार फडक्यांना राहिला नाहीं. कोल्हापुरास बरेच दिवस वास्तव्य केल्याकारणानेंच नारोपंतांना " भोज़रा

स्टेक्स् '' ची ही अजब शक्कल सुचली असावी असा निष्कर्ष काढणें अक्षम्य ठरणार नाहीं.

परंतु ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, ही लवादाची सूचना देखील शेवटीं आपल्याच अंगावर शेकेल अशी मनोमन खात्री पटतांच ९ नोव्हेंबर रोजीं घडलेल्या एका प्रसंगपूर्ण घटनेचा फायदा घेऊन १५ नोव्हेंबर रोजीं नारोपंतांनीं आपली " लवादनिष्ट " भूमिका ताबडतोब बदलली !

---

## मोरावर चोर ! : : ४

'सुदामः—अरे चोरा ! बरा सांपडलास ! थांब.

नूरः—तूं जसा भूत नाहींस तसा मीहि पण चोर नाहीं.

—पुण्यप्रभाव.'

सावांना सढळ हातानें मदत करणारा देव चोरांवरहि कधीं कधीं कृपा-कटाक्ष टाकीत असतोच. स्वतःला निरश्विरवादी म्हणवणाऱ्या माणसाची श्रद्धा निदान आपत्कालीं तरी परमेश्वरावर बसत असते, अशा अर्थाचें इंग्रजी भाषेंत एक सुभाषित आहे. (An atheist believes in God at night.) परस्वापहरणाच्या आरोपाची आपत्ति ओढवल्या दिवसा-पासून नारोपंतहि स्वतःचे देव पाण्यांत घालून बसलेच होते. तो देव त्यांच्या हांकेला थोडा वेळ धांवून आला, आणि त्या देवानें कानिटकरांना आणखी विपर्यस्त विधानें करण्याची दुर्बुद्धि देऊन पर्यायानें फडक्यांना थोडीशी मदतच केली. फडक्यांनीं केलेली लवादाची सूचना फेटाळून लावण्याठीं ५–११–३२ च्या ज्ञानप्रकाशांत कानिटकरांनीं जें उत्तर प्रसिद्ध केलें, त्याच्या शिरोभागीं ' कीचकवध ' नाटकांतील एक वीररसप्रधान संवाद अवतृत केला आहे. लवादाची गदा हातांत न घेतां फडक्यासारख्या चिल-

टाला टिचकी वाजवून चिरडण्याची आपल्या अंगांत धमक आहे हाच मनोदय या अवतरणामार्फत कानिटकरांना व्यक्त करावयाचा होता. 'वादाला फाटे न फोडतां मीं दाखवून दिलेल्या सत्तावीस साम्यस्थळां-बाबत मुद्देसूद आणि समाधानकारक उत्तर देऊन मोकळे व्हा' या आव्हा-नाचा उच्चार करीपर्यंत कानिटकरांनीं स्वत:करतां निवडलेली भीमसेनाची भूमिका व्यवस्थित रीतीनें पार पाडली. पण त्यानंतर मात्र कानिटकरांनीं स्वत:ची स्थिति फारच केविलवाणी आणि हास्यास्पद करून घेतली.

पाठ केलेली नक्कल ऐन वेळीं विसरल्यामुळें गांगरून गेलेला नट स्वत:च्या तोंडचीं वाक्यें घुसडून वेळ मारून नेण्याच्या नादांत नाटकाचा मात्र बेरंग करून टाकतो. कानिटकरांनीं हुबेहुब असाच प्रकार केला. "ज्याच्या-जवळ दहांपैकीं दोन वस्तू सांपडल्या, त्यानेंच दहाही चोरल्या असें म्हणणें न्यायाचेंच होईल. बाकीच्या आठ वस्तू जर त्यानें चोरल्या नसतील, तर तसें शाबीत करण्याचा बोजा आरोपीवर असतो, हें मी आपणांस सांगाव-यास पाहिजे असें नाहीं. तेव्हां अर्थातच मीं दाखवलेल्या भागाव्यतिरिक्त पुस्तकांतील भाग आपलाच आहे-शब्दन्, शब्द वाक्यन् वाक्य आपल्याच स्वतंत्र प्रतिभेच्या पोटीं जन्माला आलें आहे, हें सिद्ध करण्याची जबाबदारी आपणांवरच आहे" अशी बडबड करून कानिटकर मोकळे झाले. १४ ऑक्टोबर रोजीं त्यांनीं केलेल्या अतिव्याप्त विधानांत असल्या या विपर्यस्त विधानाची भर घातली. कानिटकरांसारखा वकील देण्यांत भोरकर कुलकर्ण्यांच्या हातून मोठी चूक झाली, असें मीं म्हटलें आहे तें येवढ्याच-साठीं. दहांपैकीं दोन वस्तू ज्याच्याजवळ सांपडल्या त्यानेंच दहाहि वस्तू चोरल्या असें म्हणणें ज्या न्यायपद्धतीला अनुसरून होतें, अशी एखादी सुलतानी न्यायपद्धत पृथ्वीवर प्रचलित असेल असें मला वाटत नाहीं. माझ्या माहितीप्रमाणें मी इतकेंच सांगतों कीं, फिर्यादीपक्षानें केलेले आरोप सिद्ध होईपर्यंत आरोपी निर्दोष समजला जातो, आरोप सिद्ध करण्याची जबाबदारी सर्वस्वीं फिर्यादी पक्षावर असते आणि फिर्यादी पक्षानें सप्रमाण सिद्ध केलेले आरोप नाशाबित करण्याची जबाबदारी मात्र आरोपीवर येत असते. सकृद्दर्शनीं सत्तावीस साम्य स्थळें सप्रमाण सिद्ध केल्यावर, तेवढ्याच स्थळांबाबतचा पुरावा नाशाबीत करण्याची जबाबदारी

फडक्यांवर टाकण्यांत येऊन ' प्रतिभासाधन ' पुस्तकांतील इतर भागासंबंधीं आतिव्याप्त विधानें करण्याचा धाडसी खटाटोप कानिटकरांनीं मुळींच करायला नको होता. तसा खटाटोप केल्यामुळें फडक्यांकरतां लावून ठेवलेल्या सांपळयांत स्वतः कानिटकरच अडकले.

उत्तरां—प्रत्युत्तरांची सरबत्ती झडून ऐन रंगांत आलेल्या या नाटकांत याचवेळीं अनपेक्षितपणें एका विष्कंभकाची भर पडली. वृत्तपत्रांत छापून आलेल्या स्वतःच्या नांवाची नशा मोठी मादक असते. प्रवेशपरीक्षेच्या द्वारांतून पसार होणाऱ्या उमेदवारांपासून तों साहित्यक्षेत्राच्या प्रवेशद्वाराशीं घुटमळणाऱ्या उमेदवारांपर्यंत सर्वांवरच या नशेचा अंमल कमीअधिक प्रमाणांत होत असतो. या नशेपायीं आत्मप्रसिद्धीच्या लोभाला मनुष्य बळी पडतो आणि आत्मप्रसिद्धीला लालचावलेल्या माणसाचें मन वाटेल त्या अनिष्ट गोष्टी करण्याकरितां उद्युक्त होतें. फडक्यांविरुद्ध परस्वाहरणाचा ऐनाजिनसी पुरावा आपण स्वतः तयार करून दिला असतां आपल्या नांवाचा वृत्तपत्रांतून कोठेंच गाजावाजा होत नाहीं; उलट कानिटकरांच्याच नांवांचा जिकडे तिकडे जयघोष होऊन 'साधु साधु' या प्रोत्साहनपूर्वक शब्दसुमनांची वनमाला त्यांच्याच गळयांत पडत आहे, या गोष्टीचें वैषम्य वाटूनच कीं काय कोण जाणे, आतांपर्यंत स्वखुषीनें अंगावर चढवलेला फौजदारी डगला पट्टा झुगारून देऊन कानिटकरांनीं पांघरलेला बॅरिस्टरी झगा स्वतःच्या अंगावर चढवण्याची दुर्बुद्धि कुलकर्ण्यांना झाली.

नारोपंतांनीं केलेला परस्वापरहणाचा गुन्हा जनतेच्या न्यायासनासमोर मांडल्यामुळें लोकांच्या कौतुकास पात्र झालेल्या कानिटकरांवरच कुलकर्ण्यांकडून ९ नोव्हेंबरच्या ज्ञानप्रकाशांत परस्वापहरणाचा जाहीर आरोप करण्यांत आला. 'मीं लिहिलेला लेख कानिटकरांनीं दडपून स्वतःच्या नांवावर प्रसिद्ध केला ' अशा आशयाच्या आव्हानवजा सरबत्तीची झोड ज्ञानप्रकाशच्या रकान्यांत झडतांच नारोपंत फडक्यांना तर चांगलेंच फावलें ! आपल्यावर परस्वापहरणाचा आरोप करून तो आरोप सिद्ध करण्याकरितां मोठ्या दिमाखानें आपल्याला न्यायासनासमोर खेंचणाऱ्या वकिलावरहि त्याच स्वरूपाचा गंभीर आरोप केला गेल्यामुळें थोडक्याच वेळांत तो वकीलहि आपल्याच शेजारीं आरोपींच्या पिंजऱ्यांत खेंचला जाण्याचा संभव आहे, अशी

कुणकुण नारोपंतांच्या कानांवर येतांच नारोपंतांनींहि आपला पवित्रा एकदम बदलला. आपण केलेली लवादाची सूचना फेटाळून विद्वानांच्या खासगी सभेची कल्पना प्रसृत केल्याबद्दल अधिकाऱ्यांवर त्यांनीं प्रथम दांतओठ चावले. 'प्रस्तुतचा वाद माझ्यांत व त्याच्यांत नसल्यामुळें सभेच्या उपक्रमाचा खटाटोप अधिकाऱ्यांनीं करूं नये' असें अधिकाऱ्यांना बजावून स्वतःची बाजू बळकट असल्याबद्दलचा निर्वाळा १५ नोव्हेंबरच्या ज्ञानप्रकाशांत त्यांनीं पुढीलप्रमाणें प्रसिद्ध केला. "कानिटकरांनीं दिलेले क्लेटनच्या व माझ्या ग्रंथांतील सदृश वाटणारे उतारे मुद्दाम पूर्वापार संबंध वगळून विकृत स्वरूपांत पुढें मांडले आहेत...कानिटकरांनीं दिलेले उतारे किती विकृत आहेत व त्यांनीं उत्पन्न केलेला भ्रम किती पोकळ आहे हें अगदीं कानिटकरांच्या मूळ टीकालेखांतील प्रत्येक कलम ओळीनें घेऊन दाखविण्या-इतकी सामुग्री मजजवळ आहे. त्याबद्दलचा विस्तृत टीकालेख लवकरच मराठी वाचकांस वाचावयास मिळेल. माझी खात्री आहे कीं, तो वाचल्यावर सध्यां माझ्या ग्रंथासंबंधीं माजलेला गैरसमज सर्वतोपरी नष्ट होईल....कानिटकरांनीं दाखवलेले उतारे मला कबूल आहेत असें मीं कधीं म्हटलें नाहीं...त्या उताऱ्यांचें वैय्यर्थ्य दाखविण्याची माझी तयारी आहे. परंतु कानिटकरांचा म्हणून प्रसिद्ध झालेला पहिला टीकालेख अमक्याचा, व तो अमका त्या लेखांतील सारे मुद्दे लढवायला तयार आहे असा निश्चय होईपर्यंत मला माझ्या विस्तृत उत्तराचें प्रकाशन लांबणीवर टाकणें भाग आहे." कुलकर्ण्यांनीं गोळा केलेलीं पिसें लावून मोर म्हणून मिरवणाऱ्या कानिटकरांचें सोंग अशा रीतीनें उघडकीस आल्यामुळें चोराचें मात्र चांगलेंच फावलें! आणि मजा अशी कीं, "कानिटकर जर मोर नाहींत तर मींहि चोर नाहीं" अशा तऱ्हेच्या हाकाट्या पिटायला त्यांनीं सुरवात केली.

पण मी असें विचारतों कीं, कानिटकरांनीं उत्पन्न केलेला भ्रम किती पोकळ होता हें कलमवार उत्तर देऊन दाखवण्याइतकी जय्यत सामुग्री जर फडक्यांच्या संग्रहीं होती, आणि उत्तरादाखल लिहिण्यांत येणारा टीकालेख लोकांत माजलेला गैरसमज सर्वतोपरी नष्ट करण्याइतपत तडाखे-बंद होणार असल्याबद्दलची खात्री स्वतः फडक्यांना होती, तर 'एवं

गुणविशिष्ट ' असा तो टीकालेख त्यांनीं ताबडतोब प्रसिद्ध कां केला नाहीं ? मूळच्या टीकालेखाचें जनकत्व कानिटकरांकडे जातें कीं कुलकर्ण्यांकडे जातें हा अप्रस्तुत प्रश्न उपस्थित करून विस्तृत उत्तराचें तें खड्ग म्यानाबाहेर न काढण्यांत फडक्यांचा काय हेतु होता ? ' कानिटकरांचा म्हणून प्रसिद्ध झालेला पहिला टीकालेख अमक्याचा, व तो अमका त्या लेखांतील सारे मुद्दे लढवायला तयार आहे असा निश्चय होईपर्यंत ' त्या ' विस्तृत उत्तराचें प्रकाशन लांबणीवर' टाकण्याचें वस्तुतः कांहींच प्रयोजन नव्हतें. मूळ लेखाच्या औरस घराण्याचा वंशवृक्ष चाळून व त्या लेखाच्या जनकपित्याचा पत्ता लावून त्याचें एकट्याचेंच समाधान करण्याची इच्छा फडक्यांच्या मनांत .होती असें म्हणावें, तर मूळ टीकालेखाच्या दत्तक प्रकरणाचा प्रश्न उपस्थित होण्याच्या आधींच कानिटकरांच्या कानांत विस्तृत उत्तराचा हा मंत्र त्यांनीं कां सांगितला नाहीं ? ' ग्यानबाची मेख ' इथेंच आहे. प्रसिद्धीच्या हव्यासाला बळी पडून ' उधारउसनवार ' भांडवलावर दोघांनीं स्वतंत्रपणें जो ' अव्यापारेषु व्यापार ' केला तो दोघांच्याहि अंगाशीं आल्यावर आपापली बाजू सावरण्याकरितां एकमेकांना हुलकावण्या देण्याची आवश्यकता दोघांनाहि भासूं लागली. उत्तरासाठीं आवश्यक असणाऱ्या सामुग्रीची जुळवाजुळव करण्याच्या ज्या कारणाकरितां कानिटकरांनीं दिवाळीचा वायदा उघड उघड मागून घेतला, त्याच कारणांकरतां, पण उघड तसें न दर्शवतां, फडके उत्तराची नुसती हुलकावणी दाखवीत होते. वादाला फुटतील तेवढे फांटे फोडून वादाच्या मूळ मुद्द्यावरून लोकांचें लक्ष उडवून लावायचें आणि स्वतःचा माथा मात्र उजळ ठेवायचा हें एकच उद्दिष्ट फडक्यांनीं एकसारखें डोळ्यासमोर ठेवलें होतें.

फडक्यांच्या म्हणण्याप्रमाणें हा वाद खाजगी स्वरूपाचा होता असें समजावें तर ' स्वस्थ बसल्यानं माझ्याविषयीं लोकांचा गैरसमज वाढण्याचा उघडच संभव होता ' अशी लोकापवादाची धास्ती स्वतःच्या मनांत असल्याबद्दलची स्पष्ट कबुली फडक्यांच्याच तोंडून पूर्वी एकदां बाहेर पडली होती ! वाद खासगी स्वरूपाचा असता किंवा फडक्यांचें मन पूर्णपणें निष्पाप असतें, तर लोकापवादाच्या धास्तीनें फडक्यांचें काळीज धडधडण्याचें वस्तुतः कांहींच कारण नव्हतें. पण वस्तुस्थिति अशी होती कीं, फडक्यांचा 'आंतला

आवाज ' फडक्यांना ' तूं उचलेगिरी केली आहेस ' असें ' टिच्चून ' सांगत होता, तरी त्या आवाजाचे पडसाद दडपून टाकण्याकरितां ' मी निर्दोषी आहे, कानिटकरांनी दाखविलेले उतारे मला कबूल आहेत असें मी कधीं म्हटलें नाहीं ' असा कांगावा मुक्तकंठानें फडके त्या वेळीं करीत होते ( आणि अद्यापहि करीत आहेत. ) ' उतारे मला कबूल आहेत ' असें फडक्यांनीं कधीं म्हटलें नाहीं हें खरें आहे; तसेंच ' उतारे मला कबूल नाहींत ' असा स्पष्ट इन्कारहि त्यांनीं कधीं केला नाहीं हेंहि तितकेंच खरें आहे. चौकशीसाठीं न्यायासनासमोर आणलेल्या आरोपीला ' तुझ्यावर ज्या गुन्ह्याचा आरोप करण्यांत येत आहे तो गुन्हा कबूल आहे काय ? ' असा प्रश्न केल्यावर ' होय ' किंवा ' नाहीं ' असें स्पष्ट उत्तर त्याला द्यावें लागतें. ' मला गुन्हा कबूल आहे असें मी कधीं म्हटलें नाहीं ' अशा प्रकारचें गुळमुळीत उत्तर देऊन त्याला पळवाट काढतां येत नाहीं.

---

## तमासगिराचा थयथयाट : : ५

"कोणत्याहि पक्षापेक्षां सत्य हें अधिक श्रेष्ठ आहे. तें लपविल्यानं कोणाचंच कल्याण होत नसतं. . . ."

फडक्यांनीं अनुवादित केलेल्या ' वादळा ' च्या प्रस्तावनेंतील स्वतः फडक्यांनींच लिहिलेलीं वाक्यें.

प्रतिभासाधन वाद हा साहित्यिकांच्या दृष्टीनें अव्वलपासून अखेरपर्यंत सार्वजनिक स्वरूपाचा होता. या वादांतलें गांभीर्य नष्ट होऊन त्याला सार्वजनिक करमणुकीचें स्वरूप प्राप्त झालें असेल तर तें एकाच कारणामुळें. अशा तऱ्हेच्या वादविवादांत सामान्यत: जे शिष्टाचार पाळावयाचे असतात त्या शिष्टाचारांचा अतिक्रम कानिटकर—फडके—कुलकर्णी या तिघांच्याहि हातून झाला. त्यांतल्यात्यांत नारोपंत फडक्यांनीं असभ्य वाक्प्र-

योग वापरायला प्रथम सुरुवात करून वादाच्या बैठकीला मच्छीबाजाराचें स्वरूप प्राप्त करून दिलें ही गोष्ट मुळींच नाकारतां येणार नाहीं. पण असें असूनहि हें आधुनिक स्मृतिकार " पुणेंकरांना तमाशा पाहिजे होता " असें म्हणतात ! पुणेंकर प्रेक्षक तमाशाप्रिय होते असें त्यांच्या म्हणण्याप्रमाणें गृहीत धरलें, तर त्यामुळें तमासगिराची भूमिका ओघानेंच आपल्याकडे चालून येते, हें मात्र हे तर्कशास्त्रज्ञ प्रोफेसर महाशय अजिबात विसरून गेले ! वास्तविक पुणेंकर साहित्यसेवकांनीं ' प्रतिभासाधन ' वादाकडे लक्ष्य पुरविलें असेल तर तें केवळ सत्यान्वेषणाच्या निःपक्षपाती दृष्टीनें. त्याचप्रमाणें या वादांत भाग घेऊं इच्छिणाऱ्या उभयपक्षीय विवादकांना स्वतःचा युक्तिवाद स्पष्टपणें लोकांसमोर मांडण्याची मुभा पुण्याच्या ज्ञानप्रकाश पत्रानें दिली होती. हें मुद्दाम सांगण्याचें कारण असें कीं, ' प्रतिभासाधन ' वादाच्या बाबतींत ' ज्ञानप्रकाश ' पत्राची भूमिका तितकीच निःपक्षपातीपणाची होती. असें असूनहि या वादाची शिळी आणि थंडगार कढी दहा वर्षांनीं कढवूं पाहणारे नारोपंत फडके, पुणेंकरांवर आणि ज्ञानप्रकाशवर कशा दुगाण्या झाडीत आहेत हें पाहणें जरा मनोरंजक ठरेल.

नारोपंत लिहितात, " तीनशें पृष्ठांच्या ग्रंथांतील बारा वाक्यें व तीन पॅरिग्राफ प्रो. फडके यांचे नाहींत, यावरून फडके यांचा ग्रंथ केवळ एका इंग्रजी ग्रंथाचा अनुवाद आहे असा सिद्धांत आपण वाचकांच्या गळीं उतरवूं पाहतां ! हें जरा—फारच—गैर नव्हे काय ? [ ज्ञानप्रकाशमध्यें मूळ पत्रांत प्रसिद्ध झालेलीं व नारोपंतांनीं 'साहित्यसेवेंतील स्मृतींत' आतां गाळलेलीं अशीं कांहीं वाक्यें पुढीलप्रमाणें आहेत. 'पुस्तकाची पृष्ठसंख्या सुमारें २६० आहे. या पृष्ठसंख्येंतील तीन पृष्ठांतील मोठाले पॅरिग्राफ आणि इतर निरनिराळ्या बारा पृष्ठांतील मधलीं मधलीं वाक्यें आपण उद्धृत केलीं आहेत; व त्यांच्या अस्सल इंग्रजी प्रती क्लेटनसाहेबांच्या पुस्तकांतून आपण काढून दिल्या आहेत. आपल्या सुमारें आठ नऊ कॉलमी लेखांत मीं वर म्हणतों यापलीकडे आपण कांहीं केलें नाहीं. ' मूळ पत्रांतील हीं वाक्यें उद्धृत करण्याचा हेतु इतकाच कीं, स्वतःच्या मूळ पत्रांतील

मजकुरांत स्वतःच्या सोयीसाठीं फेरफार करतांना फडक्यांनीं केलेली हातचलाखी वाचकांच्या नजरेस आणणें जरूर आहे. ]

" टेहळणीचें पवित्र कार्य हातीं घेतल्यानंतर माझें सर्व श्रेय लुबाडून घेण्याचा लुटारूपणा करण्याचें कार्य आपणास लज्जास्पद वाटलें पाहिजे... प्रतिभासाधन हें कित्येक वर्षांच्या माझ्या अध्ययनाचें, मननाचें, स्वतंत्र विचाराचें व परिश्रमांचें फल आहे हें मी पुन्हां टिच्चून सांगतों. माझ्या उत्तरावर कानिटकर गप्प बसतील हें शक्यच नव्हतें. त्यांनीं ज्ञानप्रकाशमध्यें पुन्हा लेख लिहिला, आणि त्यानंतर वादाची अशी कांहीं वावटळ उडाली कीं जणूं आपल्या नांवाची जाहिरात करण्याच्या संधीच्या वाहत्या गंगेंत हात धुऊन घेण्याच्या बुद्धीनं ज्यानं उठावं त्यानं याबद्दल ज्ञानप्रकाशांत अगर इतरत्र कांहीं तरी लिहावं असा प्रकार सुरू झाला. दत्तो वामन पोतदार, कृ. पां. कुलकर्णी, बापूराव आंबेकर, प्र. के. अत्रे, वसंतराव देसाई, कमतनूरकर, देवभक्त, वाडिकर इत्यादि दोन-तीन डझन लोकांनीं आपापले विचार जाहीर केले....या छोट्या मोठ्या लेखकांच्या मनांतील अभिप्राय असाच दिसला कीं, बरी भट्टी पेटली आहे, यांतून फडके तावून सुलाखून कसे काय बाहेर पडतात तें पाहण्यांत गम्मत आहे. "

सत्याचा आभास उत्पन्न करण्याकरितां फडक्यांनीं या ठिकाणीं मात्र कसून प्रयत्न केला आहे. घडलेले प्रसंग व त्या त्या प्रसंगांशीं निगडित असलेल्या कांहीं व्यक्तींचीं नांवें बरोबर असलीं, तरी त्या घडलेल्या प्रसंगांचा क्रम व त्या प्रसंगांवरून निघणारीं अनुमानें शक्य तितकीं सदोष आणि विपर्यस्त स्वरूपांत मांडून फडक्यांनीं कशी सफाईदार हातचलाखी केली आहे हें पाहण्यासारखें आहे. उपस्थित झालेल्या वादांत आपला शब्द सदोदित शेवटचा असावा या अट्टाहासामुळें कानिटकरांनीं माझ्या पत्राला उत्तर देऊन वावटळ उत्पन्न केली. या वावटळीचा फायदा घेऊन पोतदार, कुलकर्णीप्रभृति छोट्यामोठ्या लेखकांनीं या बाबतींत लेखण्या झिजवून आत्मप्रसिद्धीची हौस भागवून घेतली आणि कानिटकरांनीं पेटवलेल्या भट्टींतून माझ्यासारखा असामान्य आणि सुप्रसिद्ध लेखक तावूनसुलाखून बाहेर पडण्याऐवजीं बहुतेक जळून खाक होईल अशा

कुत्सित अपेक्षेनें हे डझन  दोन डझन  लोक त्या भट्टीभोंवतीं ठाण मांडून बसले.  पण मी काय असल्या लुंग्यासुंग्या  लोकांना हार जातों ?  शंभर-नंबरी  आणि बावनकशी सोन्याचा दीप्तिमान्  तजेला  अंगावर  चढवून मी या अग्निदिव्यांतून  बाहेर पडलों,  अशा  आशयाची  फुशारकी फडक्यांना मिरवायची आहे.  फडक्यांनीं सूचित केलेल्या गोष्टींपैकीं निदान कांहीं गोष्टी तरी  फडक्यांच्या इच्छेप्रमाणें  घडायला  हव्या होत्या ! ज्या दत्तोपंत पोतदारादि  लोकांचा फडक्यांनीं  मुद्दाम निर्देश केला आहे,  ते लोक आरंभीं अप्रसिद्ध असून ' येन  केन प्रकारेण ' प्रसिद्धि मिळवण्याची त्यांच्या मनांत तळमळ असायला  हवी होती.  कानिटकरांच्या उत्तराच्या वावटळीमुळें निर्माण झालेल्या वाहत्या गंगेंत  हात धुऊन घेण्याकरितां ही मंडळी  उत्सुक  असायला  पाहिजे  होती;  आणि  त्या  उत्सुकतेच्या भरांत फडक्यांसंबंधीं मत्सरयुक्त  अभिप्राय त्यांच्या  लेखण्यांतून बाहेर पडायला हवा होता.  हें इतकें सगळें  घडलें  असतें  तर मात्र फडक्यांची ही कागाळी सर्वथैव न्याय्य ठरली असती;  पण  फडक्यांच्या दुर्दैवानें यांतील एकहि गोष्ट खरी नाहीं.  आपल्या उत्तरानें  कानिटकर  गप्प बसतील  हें फडक्यांना शक्य कां वाटलें नाहीं ?  सगळें पाणी तर  इथेंच मुरत आहे. आपण  कानिटकरांना  दिलेलें उत्तर  बिनतोड  नाहीं—त्या  उत्तरांत आपण पुष्कळ  हातचलाखी केली आहे—असें फडक्यांचें मन  फडक्यांना अंतस्थ ग्वाही देत होतें म्हणूनच त्यांना असें वाटलें.  बिनतोड,  खात्रीपूर्वक आणि असंदिग्ध उत्तर देऊन फडके मोकळे झाले असते,  आणि त्याउपर कानिटकरांनीं  वादाची वावटळ  उठवण्याचा  पोंचट प्रयत्न  केला असता तर चार समंजस लोकांनीं कानिटकरांचे कान  उपटून त्यांना गप्प बसायला भाग  पाडलें असतें. ज्या  वावटळीबद्दल  फडके  कानिटकरांवर दोषारोपण करूं पाहत आहेत, ती वावटळ कानिटकरांच्या उत्तरामुळें उत्पन्न झाली नसून फडक्यांच्याच उतावळेपणानें निर्माण झाली होती,  हें सहज सिद्ध करतां येण्याजोगें आहे.

"मीं आपल्या लेखांत जे समानार्थी उतारे दाखवले आहेत, ते स्वतःचे आहेत असें सिद्ध करा, नाहीं तर मला दोनशें रुपये द्या.  उघड गुन्ह्याला लवाद पाहिजे कशाला ?" अशा  आशयाचें  कानिटकरांनीं  फडक्यांच्या

आव्हानाला प्रत्युत्तर दिलें. हें उत्तर ५ नोव्हेंबरच्या ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालें, आणि त्यानंतर वादाला ' अशिष्ट स्वरूप प्राप्त होऊं लागल्यानें ' हा वाद निकालांत काढण्याकरतां लवादाऐवजीं पंधरा विद्वानांची एक खासगी सभा १९ नोव्हेंबर रोजीं आपण बोलावणार आहों असें अधिकारी यांनीं ११ नोव्हेंबरच्या ज्ञानप्रकाशांत जाहीर केलें. सभेच्या पंधरा नियोजित सभासदांना ज्याप्रमाणें सभेचीं आमंत्रणें धाडलीं होतीं, त्याप्रमाणेंच तीं रा. प्र कानिटकर, भा. म कुलकर्णी व ना. सी. फडके यांनाहि धाडण्यांत आलीं होतीं. अधिकाऱ्यांनीं धाडलेल्या निमंत्रणाला उत्तर देण्याचें दाक्षिण्यहि फडक्यांनीं प्रथम दाखवलें नाहीं. 'बीचमें मेरा चांद भाई' म्हणून पुढें सरसावलेल्या, या 'हरहुन्नरी व्यक्ती'नें काढलेल्या सभेच्या कल्पनेला निमंत्रित लोकांकडून परभारेंच अर्धचंद्र मिळून आपली लवाद नेमण्याची सूचना बहुतांशीं ग्राह्य होईल, अशी फडक्यांची अटकळ होती. पण १३ नोव्हेंबरच्या ज्ञानप्रकाशांत अधिकाऱ्यांचें दुसरें एक पत्र प्रसिद्ध झालें. पंधरा निमंत्रित लोकांपैकीं आठ जणांनीं (श्री. नी. चापेकर, बा. मा. आंबेकर, द. वा. पोतदार, कृ. पां. कुलकर्णी, प्र. के. अत्रे, य. रा. दाते, श्री. म. माटे, दा. न. शिखरे) सभेला हजर राहण्याचें कबूल केल्याची बातमी देऊन नियोजित सभा भरणार असल्याचें आश्वासन या पत्रामार्फत अधिकाऱ्यांनीं जाहीर रीत्या दिलें होतें. आपण आपल्या मनाशीं बांधलेला कयास साफ चुकला. जी सभा भरूं नये व भरणार नाहीं असें ज्या सभेसंबंधीं आपल्याला वाटत होतें— ती सभा भरणार असें समजून येतांच फडक्यांच्या तळव्याची आग मस्तकाला जाऊन भिडली. तावातावानें १५ नोव्हेंबरच्या ज्ञानप्रकाशांत फडक्यांनीं एक पत्र प्रसिद्ध केलें. अधिकाऱ्यांना ही सभा बोलावण्याचा काय अधिकार ? प्रस्तुतचा वाद माझ्यांत व त्यांच्यांत चाललेला नाहीं, अशा आशयाचा एक मुद्दा उपस्थित करून अधिकाऱ्यांनीं सुचवलेली खासगी सभेची कल्पना मुळांतच मारून टाकण्याचा फडक्यांचा हेतु होता. येवढें पत्र प्रसिद्ध करूनच फडके थांबले नाहींत. ज्या लोकांना अधिकाऱ्यांनीं सभेसाठीं निमंत्रणें पाठविलीं होतीं, त्या लोकांना फडक्यांनींहि स्वतंत्र पत्रें पाठवलीं ! सभेच्या विचारापासून अधिकाऱ्यांना

परावृत्त करावें असा सूर या पत्रांत होता. हें पत्र मूळ इंग्रजींत होतें. त्याचा मराठी अनुवाद ज्ञानप्रकाशच्या १५ नोव्हेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झाला होता. फडके जिला ' वादाची वावटळ ' म्हणतात, त्या वावटळीला खुद्द फडक्यांनींच अशा रीतीनें सुरुवात केली. ज्या लोकांचा फडक्यांनीं उल्लेख केला आहे, त्या लोकांनीं अधिकारी व फडके यांच्याकडून आलेल्या पत्रांवर स्वतःचा अभिप्राय देऊन अधिकारी बोलवीत असलेल्या सभेचा न्याय्यपणा फडक्यांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न या अभिप्रायांत व्यक्त केला होता.

हीं सर्व पत्रें १७ नोव्हेंबरच्या ज्ञानप्रकाशांत—म्हणजे कानिटकरांच्या प्रत्युत्तरानंतर बारा दिवसांनीं प्रसिद्ध झालीं. या लोकांनीं हीं पत्रें स्वतंत्र रीत्या लिहिलेलीं नाहींत किंवा त्यांत फडक्यांसंबंधीं कोणताहि कुत्सित अथवा उपमर्दकारक उल्लेख केलेला नाहीं. असल्यास तो फडक्यांनीं अद्यापहि काढून दाखवावा. उलट, या लोकांचा उल्लेख करतांना 'दोन तीन डझन लोक' असा उपहासात्मक शब्दप्रयोग वापरून फडक्यांनींच स्वतःची कुत्सित मनःप्रवृत्ति उघड करून दाखविली आहे. फडके सांगतात त्या ' दोन तीन डझन ' लोकांपैकीं दे. द. वाडेकर यांच्या सहीचा एक व देसाई, कमतनूरकर, देवभक्त या तिघांच्या सहीचा एक असे दोन लेख मात्र स्वतंत्र रीत्या ज्ञानप्रकाशांत अनुक्रमें ११ नोव्हेंबर व १६ नोव्हेंबर रोजीं प्रसिद्ध झाले आहेत. कानिटकर किंवा फडके या उभयतांनीं इतःपर एकमेकांचीं खातेरीं उपसण्याऐवजीं आपापल्या खातेवह्या पुढें आणाव्यात, मोकळ्या मनानें हिशेब चुकता करून टाकावा आणि या वादाचें अवभृतस्नान उरकून टाकावें, अशा आशयाची सूचना वाडेकरांनीं केली होती. यःकश्चित् गोष्टीला लवादाचा बिसमिल्ला मागण्याचा आग्रह धरण्याऐवजीं ' प्रतिभासाधन ' लिहितांना उपयोगांत आणलेल्या सर्व आधारभूत ग्रंथांची यादी फडक्यांनीं प्रसिद्ध करून वादाची वावटळ मिटवून टाकावी अशा स्वरूपाचा अभिप्राय देसाई—कमतनूरकर—देवभक्त या त्रयीनें केवळ त्रयस्थ या नात्यानें व्यक्त केला होता. कानिटकर आणि फडके यांमधील वाद मिटावा—जास्त पेटूं नये—अशीच इच्छा सर्वांनींच प्रदर्शित केली होती. यावरून ' वादाची वावटळ '

केव्हां उपस्थित झाली, ती कोणीं उपस्थित केली आणि त्यांत दत्तोपंत पोतदार, कृ. पां. कुलकर्णी, बापूराव आंबेकर इत्यादि 'दोन तीन डझन' लेखकांचें कितपत अंग होतें, ह्या गोष्टी वस्तुतः कशा होत्या आणि आत्मसमर्थनार्थ फडक्यांनीं त्या विकृत स्वरूपांत कशा मांडल्या आहेत यांसंबंधींची खात्री वाचकांना होण्यासारखी आहे.

या वादाच्या बाबतींत ज्या 'ज्ञानप्रकाश' पत्रानें स्वतःची निःपक्षपाती भूमिका शेवटपर्यंत कायम ठेवली होती त्या 'ज्ञानप्रकाश' पत्राच्या वृत्तपत्रीय भूमिकेबद्दल संशय व्यक्त करतांना नारोपंतांनीं जे 'तारे तोडले' आहेत ते मात्र पाहण्यासारखे आहेत ! कानिटकरासारख्या एका अप्रसिद्ध लेखकूनें तिहीं लोकांत झेंडा नाचवणाऱ्या आपल्यासारख्या एका ख्यातनाम लेखकावर अशा रीतीनें हल्ला चढवून आपला उपमर्द करावा या विचारानें 'उसळत, पसरत, तुडवित तनुला कोप हा शमावितां नच शमला' अशी फडक्यांची अवस्था झाली. त्या लेखकू पोराला अक्कल नव्हती म्हणून त्यानें माझ्या सिंहासनाच्या पायरीला पाय लावण्याचा पापी विचार मनांत आणला असेल एक वेळ; पण ज्ञानप्रकाश नांवाच्या त्र्यायशीं वर्षांच्या त्या जख्खड थेरड्यानें या पोरट्याच्या असल्या धाडसी धोरणाचा उघड उघड पुरस्कार करावा म्हणजे काय ! अशा आशयाचे एकापेक्षां एक जालीम विचार त्यांच्या डोक्यांत थैमान घालूं लागले. ज्ञानप्रकाशवर असलेला रोष त्यांनीं कसा व्यक्त केला आहे तो पहा. "मी व ज्ञानप्रकाश यांत मोठंसं प्रेम कधीं उतूं गेलं नव्हतंच...माझे पाय ओढण्याची संधि दिल्यास ती पर्वणीप्रमाणं साधण्यास ज्ञानप्रकाश कमी करणार नाहीं हें माझ्या लक्षांत आलं. पुढं तर कांहीं मंडळींकडून मला असंहि कळलं कीं, कानिटकरांचा तो लेख प्रसिद्ध होण्यापूर्वी ज्ञानप्रकाशमध्यें त्याबद्दलची खलबतं झालीं होतीं, आणि माझ्यावर हल्ला चढवण्याचा व्यवस्थित मनसुबा मुक्रर झाला होता. कांहीं वर्षांपूर्वी गोगटे नांवाच्या एका ताज्या पदवीधर तरुण गृहस्थानें लिहिलेल्या एका कथासंग्रहावर—पुस्तकाचं नांव मला आठवत नाहीं—ज्ञानप्रकाशनें झोड उठविली होती; त्या गृहस्थाचं एकहि पुस्तक त्यानंतर प्रसिद्ध न झाल्यामुळं आपण त्या लेखकाला कायमचा नेस्तनाबूत करूं शकलों अशी ज्ञानप्रकाशनं स्वतःची समजूत करून घेतली होती."

या गोगट्यांचें सबंध नांव विनायक सदाशिव गोगटे. हे एम्. ए. असून यांना काशीनाथ त्र्यंबक तेलंग गोल्ड मेडल मिळालें होतें. स्वतः फडके जसे कोल्हापुरच्या राजाराम कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानविषयाचे अध्यापक आहेत, तसेच गोगटे हे जुनागडच्या बाहुद्दिन कॉलेजांत तत्त्वज्ञान विषयाचेच अध्यापक आहेत. गोगट्यांच्या पुस्तकाचें नांव फडक्यांना आठवत नाहीं, त्या पुस्तकाचें नांव 'ज्ञानसिंधु आणि इतर लघुकथा.' या पुस्तकानंतर गोगट्यांचीं दोन पुस्तकें 'नीतिशास्त्रविचार' व 'सुखाचा शोध' (बर्ट्रान्ड रसेलच्या Conquest of Happiness चा अनुवाद) प्रसिद्ध झालीं. 'सुखाचा शोध' हें पुस्तक १९३७ सालीं—म्हणजे ज्ञानप्रकाशनें 'ज्ञानसिंधू' वर टीका केल्यावर पांच वर्षांनीं प्रसिद्ध झालें. ज्ञानप्रकाशांतील टीकेनंतर गोगटे नेस्तनाबूद न होतां शाबूद राहिले होते, हें यावरून सहज सिद्ध होण्यासारखें आहे. शिवाय, गोगट्यांना आपण नेस्तनाबूद करूं अशी ज्ञानप्रकाशनें स्वतःची समजूत करून घेतल्याबद्दल फडके जी ग्वाही देत आहेत, तीबद्दल फडक्यांजवळ तरी काय पुरावा आहे? 'गोगट्यांना नेस्तनाबूत करूं शकणारें एकमेव दैनिक' असें ब्रीदवाक्य ज्ञानप्रकाशच्या मुखपृष्ठावर झळकलेलें फडक्यांच्या आठवणींच्या खोक्यांत असल्यास न कळे! "गोगट्यांना ज्याप्रमाणें आम्हीं साहित्यक्षेत्रांतून कायमचं उठवलं, त्याप्रमाणंच आतां फडक्यांनाहि उडवून दाखवूं' असे बेलभंडारा उचलून काढल्यासारखे हर्षोन्मादाचे उद्गार वर सांगितलेल्या खलबतांत काढले गेले होते, या गोष्टी जेव्हां मला कळल्या तेव्हां कानिटकरांच्या त्या लेखाला ज्ञानप्रकाशानं इतक्या घाईनं एवढी प्रसिद्धि द्यावी याबद्दल आश्चर्य करण्याचं मी सोडून दिलं, आणि कानिटकरांच्या त्या लेखाला उत्तर द्यावं कीं नाहीं येवढ्या एकाच गोष्टीचा मी विचार करूं लागलों...त्या वेळीं मीं मुंबईत होतों. 'प्रतिभासाधन' ग्रंथाची प्रत माझ्याजवळ नव्हती. परंतु सावकाश कोल्हापुरास परत गेल्यावर देतां येईल कानिटकरांच्या लेखाला उत्तर असा विचार करून स्वस्थ बसल्यानं माझ्याविषयीं लोकांचा गैरसमज वाढण्याचा उघडच संभव होता. म्हणून मी वेळ न घालवतां माझं उत्तर ज्ञानप्रकाशाकडे पाठवून दिलं."

प्रतिभासाधन पुस्तक खाजगी प्रचाराकरितां तयार करण्यांत आलें असतें आणि त्यावर जाहीर हल्ला चढविण्यासाठीं कानिटकरांनीं ज्ञानप्रकाशकडे धांव घेतली असती व ज्ञानप्रकाशनें या खासगी मालमत्तेचा पंचनामा स्वतःच्या रकान्यांतून पुकारला असता किंवा मालक, चालक, संपादक—किमानपक्षीं ‘ सहाय्यक ’ या नात्यानेंही फडक्यांचा ‘ज्ञानप्रकाश’शीं कांहीं थोडाफार ऋणानुबंध असता आणि फडक्यांच्या कानांवर या आगामी हल्ल्याची बातमी न घालतां हाताखालच्या लोकांनीं संगनमत करून कानिटकरांनीं गुपचुप तयार करून आणलेल्या या तोफेला परस्पर सरबत्ती दिली असती, तर फडक्यांना ‘ज्ञानप्रकाश’च्या या कृत्याबद्दल अचंबा वाटणें किंवा संताप येणें क्षम्य किंवा समर्थनीय तरी ठरलें असतें. पण फडक्यांची ही वाङ्मयकृति त्या वेळीं बाजारांत बसून आल्यागेल्या गिऱ्हाइकाला आपला भाव सांगत बसली होती. असें असूनही हा वाद खासगी स्वरूपाचा होता, अतएव तो ज्ञानप्रकाशनें हातीं घ्यायला नको होता असें फडके कोणत्या तोंडानें म्हणूं शकतात ? इतकेंच नव्हे, तर ‘प्रतिभासाधन ’ वादाची वावटळ शांत झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं ‘ ज्ञानप्रकाश ’नें फडक्यांची ‘ वाङ्मयविहार ’ नांवाची एक नीरस लेखमाला उदार मनानें प्रसिद्ध केली ती काय ‘ ज्ञानप्रकाश ’ कारांच्या मनांत फडक्यांबद्दल द्वेष सळसळत होता म्हणून ?

अवघ्या दहा वर्षांपूर्वी ज्या विद्वानांच्या सभेला स्वतः नारोपंतांनीं न्यायसभा मानण्याची तयारी दाखवली होती त्या सभेच्या एकमुखी निर्णयाला आज तुच्छ लेखून तिच्याबद्दल वाटेल तीं विपर्यस्त विधानें करावींत, ज्ञानप्रकाशकारांवर यथेच्छ दुगाण्या झाडाव्यात आणि पुणेकर साहित्यिकांना तमासगिरांच्या पंक्तीला बसवावें असा निंद्यप्रकार ज्यांनीं केला त्या नारोपंतांच्या हीन मनोवृत्तीवर अधिक प्रकाश पाडण्याची आवश्यकता आहे, असें मला वाटत नाहीं.

---

## ' जिंकलेल्या सभेचा ' लगुडप्रहार ६

And such is alway the case with those who embrace error. The vice does not lie in assenting to the proofs they see; but in being blind to many of the proofs that offer. —Goldsmith.

भारत इतिहास संशोधन मंडळाच्या ज्या सभागृहांत मोठ्या मेटाकुटीनें फार तर शें–दोनशें माणसें मावतील त्या सभागृहांत ' पांच–सातशें ' श्रोत्यांची काल्पनिक गर्दी भरवून व त्या श्रोत्यांसमोर टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत ' अडीच तास ' भाषण करून ती सभा जिंकल्याचा बाहणा करणारे नारोपंत फडके, आपल्या त्या लाडिक कलाविलासाचा अखेर काय परिणाम झाला ही गोष्ट मुद्दाम डोळ्यांआड करीत असले तरी समंजस माणसांची पूर्ण खात्री होऊन चुकली आहे कीं, प्रतिभासाधन समितींतील सभासदांच्या मनावर त्या भाषणाचा यत्किंचितही परिणाम न झाल्यामुळें समितीनें शेवटीं फडक्यांच्याच विरुद्ध निर्णय दिला ! लालित्यपूर्ण म्हणून फडक्यांनीं योजलेल्या त्या निवडक निवडक शब्दसंभाराला वाऱ्यावर उडवलेल्या फोलपटांचेंच स्वरूप प्राप्त झालें–फडक्यांनीं हेतुपुरस्सर केलेला तो कलाविलास अखेर एक निरर्थक कोलाहलच ठरला. 'फलानुमेयाः प्रारंभाः ' या दृष्टीनें या भाषणाचा विचार केला तर हें भाषण सामान्य श्रोत्यांच्या भावनावश दृष्टीनें कितीही रसाळ असलें, तरी बुद्धिवादी चिकित्सकांच्या काटेतोल दृष्टीनें तें अगदींच रटाळ होतें असेंच म्हटलें पाहिजे.

इतिहास संशोधन मंडळाच्या इमारतींत भरलेली ती सभा 'न्यायसभा' होती; आणि केवळ फड गाजवण्याच्या हेतूनें नव्हे, तर स्वतःवर शेकलेल्या आरोपांचें मुद्देसूद निरसन करण्याची जबाबदारी पत्करूनच फडके त्या ' न्यायसभे ' समोर उभे राहिलेले होते. स्वतःच्या वक्तृत्वानें स्वतःच्या निरपराधित्वाबद्दल न्यायसभेंतील सभासदांची त्यांनीं पूर्णपणें खात्री केली असती तर त्यांचें तें वक्तृत्व परिणामाच्या दृष्टीनें खास ' अविस्मरणीय ' ठरलें असतें. सार्वजानिक व्यासपीठावरून केलेलें वक्तृत्व

आणि न्यायासनासमोर केलेलें वक्तृत्व यांच्यांत परिणामाच्या दृष्टीनें बराच भेद असतो. श्रोत्यांच्या मनावर इच्छित परिणाम घडवून आणणें एवढेंच कार्य ' मैदानी ' वक्तृत्वामार्फत घडवून आणायचें असतें. याच्या उलट स्वतःची विचारसरणी न्यायाधीशाच्या बुद्धीला पटवून देण्याची जबाबदारी न्यायासनासमोर भाषण करणाऱ्या वक्त्याला पार पाडायची असते. निवळ ' राळफेकी ' वक्तृत्व न्यायसभेंत सहसा परिणामकारक होऊं शकत नाहीं, आणि परिणामशून्य वक्तृत्वावर ' अविस्मरणीय ', ' चिरस्मरणीय ' किंवा ' संस्मरणीय ' या विशेषणांचे शिक्के मारल्यानें तें वक्तृत्व परिणामकारकहि ठरत नाहीं. नुसतें 'वाटणें' हा मनाचा धर्म आहे; पण ' पटणें ' हें बुद्धीचें कार्य आहे. भावनावश लोकांना वाटणारी गोष्ट बुद्धिवादी लोकांना पटेलच असा नेम नाहीं. आरोपीच्या बचावाकरितां आरोपीचें वकीलपत्र घेऊन न्यायासनासमोर उभा राहणारा वकील कितीही प्रभावशाली वक्ता असला आणि न्यायालयांत जमलेल्या श्रोतृवृंदाच्या मनावर त्यानें स्वतःच्या वक्तृत्वाची कितीहि छाप पाडली, तरी स्वतःची विचारसरणी त्याला जोंपर्यंत न्यायाधीशाच्या बुद्धीला पटवून देतां येत नाहीं, तोंपर्यंत त्याच्या त्या पल्लेदार वक्तृत्वाला काडीचीहि किंमत देतां येणार नाहीं. जिवाचा इतका आटापिटा करूनहि उद्दिष्टसाध्यतेच्या दृष्टीनें कांहींहि परिणाम न होतां परिश्रमपूर्वक तयार केलेलें, पण सर्वस्वीं वायां गेलेलें वक्तृत्व या नात्यानें तें भाषण खरोखरच ' अविस्मरणीय ' समजलें पाहिजे आणि म्हणूनच त्या विकारी वक्तृत्वाच्या मैफलींत फडक्यांनीं विचारांचा कोणता मालमसाला 'न्यायसभे'ला सादर केला होता त्याचा परामर्ष घेणें जरूर आहे. आपल्यावर शेकत असलेल्या आरोपाचें निरसन करतांना नारोपंतांनीं पुढें दिल्याप्रमाणें पुळचट युक्तिवाद केला आहे.

" जें हॅमिल्टनमध्यें आहे तें इंग्लिश वाङ्मयांतील टीकात्मक ग्रंथांत सगळीकडे आहे. तें common place झालेलें आहे. त्याचा उपयोग वाङ्मयाची टीका लिहितांना कोणीहि करावा आणि तसें करतांना कोणाचेंहि ऋण मानण्याचा बोजा त्याचेवर पडत नाहीं. तसा बोजा त्याचेवर आहे असें ज्याला वाटतें, त्याला त्याचें वाचन अत्यंत आकुंचित असल्यामुळें

व कांहीं व्याख्या व सिद्धांत कोठल्या तरी एकाच पुस्तकांत वाचल्याचा नवशिक्षेपणा त्याच्या अंगीं असल्यामुळें वाटतें. ( २ ) ज्याचा व्यासंग सतत मोठा असतो त्याच्या वाचनांत अनेक सुंदर उपमा, उत्प्रेक्षा, अलंकार आलेले असतात. ते मूळ कोठें वाचले हें त्या व्यासंगी मनुष्यास प्रायः आठवत नसतें. परंतु ते त्याला अत्यंत आवडलेले असल्यामुळें त्याचे मनांत खोल रुजलेले असतात. त्यांचा उपयोग केल्यानें लेखकाकडे कमीपणा आला असें मानणें वेडेपणाचें आहे. ( ३ ) ब्रँडर मॅथ्यूजच्या Study of Drama मध्यें Influence of the Actor, Influence of the Theatre आणि Influence of the Audience अशीं प्रकरणें आहेत. या प्रकरणांचा सारांश काढून हॅमिल्टननें Art of Fiction मध्यें तो तीन परिच्छेदांत मांडला आहे. तसें करतांना हॅमिल्टननें त्या जागीं किंवा पुस्तकाच्या उपोद्घातांत किंवा इतरत्र कोठेंहि मॅथ्यूजचा नामनिर्देशहि केलेला नाहीं. आभार मानणें तर लांबच राहिलें; आणि हें सर्व केव्हां, तर मॅथ्यूजचीं पुस्तकें आधीं दहापंधरा वर्षें प्रसिद्ध झालीं असतांना व त्यानंतर Copyright : Brander Mathews असें स्पष्ट छापलेलें असतांना ! मॅथ्यूज यांच्या ग्रंथांतील शब्दच नव्हे, तर वाक्येंच्या वाक्यें हॅमिल्टननें घेतलेलीं आढळतील. ( ४ ) व्याख्या आणि सिद्धांत कोठल्याहि एका व्यक्तीच्या मालकीचे उरलेले नसून त्यांस एक प्रकारचें सार्वजनिक स्वरूप प्राप्त झालेलें असतें. त्यांची उसनवारी प्रो. ग्रूसपासून मॅथ्यूजनीं केली, किंवा मॅथ्यूजपासून हॅमिल्टननें केली किंवा हॅमिल्टनपासून ' प्रतिभासाधन ' कर्त्यांनीं केली अशी भाषा बोलणाराच्या अज्ञानाचीच कींव केली पाहिजे. ( ५ ) हॅमिल्टनच्या व माझ्या पुस्तकांत कांहीं साम्यस्थळें दिसलीं तर त्यांचा खरें पाहतां कांहीं अर्थ होऊं शकत नाहीं. कारण हॅमिल्टनच्या पुस्तकांत आढळणाऱ्या व्याख्या, कल्पना, प्रमेयें वगैरे गोष्टींचें स्वरूप मीं वर म्हटलें त्याप्रमाणें परंपरागत व समाईक मालकीच्या झालेल्या ज्ञानाप्रमाणें आहे. त्या व्याख्या, कल्पना, प्रमेयें अगर सिद्धांत इतर हव्या तेवढ्या इंग्रजी पुस्तकांतून काढून दाखवितां येतील. हॅमिल्टननें तीं त्या पुस्तकांतून घेतलीं असें म्हणणें जितकें बालिशपणाचें होईल तितकेंच माझ्यावर तसला आरोप करणेंही होईल.

(६) श्री. केळकर यांनीं 'प्रतिभासाधन' या ग्रंथावर अभिप्राय देतांना 'आधीं केलें मग सांगितलें' असे उद्गार प्रारंभींच काढले आहेत. 'मनुष्याला आमूलाग्र अशी नवी कल्पना सहसा करतांच येत नाहीं. पण अनुभवांतील वेगवेगळ्या जुन्या कल्पनांचें मिश्रण त्याला करतां येतें व तसें मिश्रण स्वतंत्रपणें करणें—दुसऱ्याचें उचलून न घेतां करणें—स्वतःच्या बुद्धीनें व स्फूर्तीनें करणें याचेंच नांव स्वतंत्र निर्मिति होय.' या (केळकरांच्या) अवतरणावरून स्वतंत्र निर्मिति कशाला म्हटलें पाहिजे या प्रश्नावरहि केळकरांसारख्या अनुभविक, व्युत्पन्न, व्यवसायी पंडिताच्या स्पष्ट मताचा प्रकाश पडतो. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीं उसनवारी केली असूनहि ती त्यांनीं आपल्या त्या त्या नाटकांच्या प्रस्तावनेंत मान्य केली नाहीं यावरून मराठी लेखकांचा शिरस्ताहि उघड होतो. म्हणजे माझ्यावर ठरीव शिष्टसंप्रदाय मोडल्याचा आरोप लागू होत नाहीं. (६) माझा 'प्रतिभासाधन' हा ग्रंथ लो. मा. टिळकांचे' गीतारहस्य', वामनराव जोशांचा 'नीतिशास्त्रप्रवेश', श्री. केळकर यांचें 'राज्यशास्त्र' अशा ग्रंथांच्या स्वरूपाचा आहे."

आत्मसमर्थनार्थ फडक्यांनीं केलेल्या पाल्हाळाचें तात्पर्य हें असें आहे. फडक्यांच्या या पुळचट युक्तिवादाचें सारसर्वस्व निराळ्या भाषेंत सांगायचें झाल्यास ते पुढें दिल्याप्रमाणें सांगतां येईल. "दुसऱ्यांच्या व्याख्या, कल्पना प्रमेयें, सिद्धान्त हीं जर वाङ्मयांत पुष्कळ प्रमाणांत फैलावलेलीं असतील तर तीं समाईक मालकीचीं समजून व्यासंगी लेखकानें तीं आपली स्वतःची मालमत्ता म्हणून दडपून वापरावींत. तीं तशीं वापरतांना ऋण मान्य करण्याचा मुळींच शिरस्ता नाहीं. पुष्कळ नामांकित लेखकांनीं असें केलें आहे. मींहि तेंच केलें आहे. फार काय, पण कोल्हटकरासारख्या प्रथितयश साहित्यिकानेंहि हाच मार्ग स्वीकारला आहे. अशा लेखकावर लोकांनीं जर उचलेगिरीचा आरोप केला नाहीं, तर तशा प्रकारचा आरोप माझ्यासारख्या असामान्य लेखकावर कां केला जावा ? त्यांतून माझा व्यासंग फार दांडगा. त्यामुळेंच तर माझा 'प्रतिभासाधन' ग्रंथ 'गीता-रहस्या'च्या तोडीचा झाला. माझें कौतुक करण्याऐवजीं माझ्यावर उचले-गिरीचा आरोप करणें म्हणजे महामूर्खपणाचें लक्षण आहे. कोल्हटकरांच्या

लेखसंग्रहाला प्रस्तावना लिहितांना केळकरांसारख्या व्युत्पन्न पंडितानें माझी बाजू कशी सावरून धरली आहे ती तरी पाहा आणि चूप बसा.''

फडके सूचित करतात त्याप्रमाणें ब्रँडर मॅथ्यूजनें स्वतःच्या कल्पनांचें किंवा प्रमेयांचे मैदान समाईक मालकीचें म्हणून सार्वजनिक उपयोगासाठीं खुलें करून ठेवलें असतें तर "Copyright Brander Mathews" या सूचनेचें कांटेरी कुंपण त्या मैदानाभोंवतीं घालण्याची आवश्यकता त्याला कां वाटली असती ? पुष्कळसे पाश्चात्य लेखक किंवा प्रकाशक 'कॉपीराइट'ची सूचना देण्याची दखलगिरी घेतात ती कशासाठीं ? "No Admisson without permission" अशी पाटी कांहीं ठिकाणीं लटकत असूनही त्या ठिकाणीं लोकांची रहदारी चालूं असल्यामुळें त्या पाटीवरील सूचना ज्याप्रमाणें पुष्कळ वेळा निरर्थक ठरते, त्याप्रमाणें copyright चें हें बुजगावणें केवळ शोभेसाठीं उभें केलेलें असतें, अशीच नारोपंतांची समजूत आहे कीं काय ? ज्या अर्थी copyright च्या कायद्याचें उल्लंघन केल्याबद्दल, इंग्लंडांत काय किंवा अमेरिकेत काय 'साहित्यशर्विलकां'वर अद्यापहि खटले भरण्यांत येतात, त्या अर्थी वाङ्मयक्षेत्रांत उचलेगिरी करणाऱ्या नारोपंतांसारख्या 'उडत्या पांखरां'ना जरब बसवण्याच्या हेतूनेंच प्रत्येक लेखक किंवा प्रकाशक ही पूर्वसूचना देऊन ठेवीत असतो, हा एकच निष्कर्ष या प्रघातावरून निष्पन्न होतो.

'उसनवारी' आणि 'उचलेगिरी' हे दोन्ही शब्द समानार्थी आहेत असा संभ्रम उत्पन्न करून व दुसऱ्यांच्या उसनवारीकडे बोट दाखवून स्वतःवर शेकलेल्या उचलेगिरीच्या आरोपांतून निसटण्याकरितां फडक्यांनीं हा खटाटोप चालवला आहे, हें मी जाणून आहे. पण उसनवारींत आणि उचलेगिरींत पुष्कळच फरक असतो. स्वतःला भासणारी उणीव भरून काढण्याच्या हेतूनें तात्पुरत्या उपयोगासाठीं मागून आणलेली वस्तु उसनवारीच्या सदरांत जमा होते. केलेली उसनवारी व्यक्त करणें किंवा त्या उसनवारीची जाणीव मनांत बाळगणें हें व्यक्तिगत मनःप्रवृत्तीवर किंवा परिस्थितीवर अवलंबून असतें. पण हीच उसनवारी मालकी हक्काच्या तोऱ्यानें मिरवूं लागली तर मात्र त्या उसनवारीला उचलेगिरीचें स्वरूप प्राप्त होत असतें. चार घरचीं चित्रें जमा करून एखाद्या गृहिणीनें स्वतःच्या घरीं गौर सजवली, तर गौरीपुढें मांडलेल्या चित्रांची उसनवारी आल्या-

गेल्या मैत्रिणीजवळ कबूल करण्याचा शिरस्ता नसतो हें खरें. पण त्याच चित्रावर ती स्वतची मालकी सांगूं लागली तर चारचौघींत तिची फट-फजिती झाल्यावांचून रहात नाहीं. प्रतिभासाधनाची गौर सजवण्यासाठीं क्लेटन हॅमिल्टनच्या घरून मागून आणलेल्या चित्रांवर फडके जेव्हां मालकी हक्क सांगूं लागले, तेव्हां मात्र फडक्यांवर उचलेगिरीचा आरोप येऊन हा इतका गहजब उडाला.

रूढ असलेल्या कल्पना किंवा सिद्धांत स्वतःच्या भाषेंत विशद करून सांगितल्यामुळेंच त्या कल्पनांची मालकी एखाद्याला बळकावतां येत असेल तर रत्नांना पैलू पाडणाऱ्या घसाऱ्याला त्या रत्नांवर, अथवा दागिन्यांची कौशल्ययुक्त गुंफण करणाऱ्या पटवेकऱ्याला त्या दागिन्यांवर मालकी हक्क सांगण्यास कोणतीच अडचण उपस्थित होणार नाहीं !

जी वस्तु स्वतःची नाहीं, ती स्वतःची आहे असें भासवणें यालाच व्यवहारांत परस्वापहरण अशी संज्ञा आहे. अशा प्रकारच्या परस्वापहरणाची दखल कायदासुद्धां मोठ्या कसोशीनें घेत असतो. एखाद्याचा गुन्हा जोंपर्यंत उघडकीस आला नाहीं, तोंपर्यंत गुन्हा करणारा मनुष्य कायद्याच्या दृष्टीनें जरी साव ठरत असला, तरी ' इतर माणसांचे गुन्हे उघडकीस आले नाहींत व कायद्यानें त्यांना शासन केलें नाहीं म्हणून मीहि निरपराधी आहे ' अशा तऱ्हेचा युक्तिवाद न्यायसभेसमोर खेंचून आणलेल्या कोणत्याहि आरोपीला करतां येत नाहीं.

गीतारहस्यासारख्या अद्वितीय ग्रंथाशीं स्वतःच्या पुस्तकाची तुलना करण्याचें फडक्यांचें बेमुर्वतखोर धाष्टर्य पाहिलें म्हणजे ' कहां राजा भोज, कहां गंगा तेली ' या म्हणीचीच आठवण होते. गीतारहस्य ग्रंथाचें अभ्यासपूर्वक परिशीलन करण्याची गोष्ट तर दूरच राहो; पण तो ग्रंथ फडक्यांनीं वरवर तरी चाळला आहे किंवा नाहीं याचाच मला संशय येतो. ' नामूलं लिख्यते किंचित् ' या वचनाची साक्ष रहस्यकारांनीं जागोजागीं पटवून दिली आहे पण ' नाममूल्यं लिख्यते किंचित् ' हें ब्रीदवाक्य डोळ्यांसमोर ठेवून कलेच्या नांवाखालीं पोटभरूपणा करण्यासाठीं लेखन करणाऱ्या या माणसानें उचलेगिरीच्या भांडवलावर स्वतःचें प्रतिभासाधन उभारलें आहे. असें असतां ' रहस्य 'कारांच्या गादीला

पाय लावण्याचा उद्दामपणा त्यानें कां करावा हेंच समजत नाहीं. आचार्यतुल्य रहस्यकारांनीं गीतोपनिषदाच्या आधारें कर्मयोगपर सिद्धांत प्रतिपादन करून ज्याप्रमाणें एक नवीन तत्त्व निर्माण केलें, त्याप्रमाणें ललित लेखनाचा असा कोणता नवा सिद्धांत आपण प्रतिपादन केलात असा प्रश्न सुद्धां नारोपंतासारख्या माणसाला विचारणें म्हणजे पर्यायानें रहस्यकारांचाच उपमर्द करण्यासारखें आहे.

स्वतंत्र ग्रंथनिर्मितीबाबत नारोपंतांनीं केळकरांची साक्ष काढलेली पाहून नारोपंतांना मराठी वाक्यांचा नीट अर्थ समजतो कीं नाहीं, याबद्दलच शंका येऊं लागते. दुसऱ्याचें उचलून न घेतां ( मिश्रण ) करणें हाच केळकरांच्या साक्षींतील महत्त्वाचा भाग आहे. आणि केळकरां-सारख्या 'अनुभविक, व्युत्पन्न व व्यवसायी पंडिताच्या' या मतप्रकाशानें फडक्यांनीं पाजळलेली मशाल तर अगदींच विझून गेली आहे! 'सौंदर्यलहरी' नांवाच्या एका कवितांच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहितांना 'हटानें हव्यासें पदसमिति काव्यब्रुव करी। कशा निर्मी सांगा मग अकवि सौंदर्यलहरी' या दोन ओळी तात्यासाहेबांनीं त्या प्रस्तावनेंत घातल्या होत्या. या दोन ओळींतील खोंच त्या कविब्रुवांच्या लक्षांत न आल्यामुळें प्रशस्तिपत्र म्हणून या ओळींचा त्यांनीं खुशाल उपयोग केला! त्या सद्‌गृहस्थांचें हें कृत्य जितकें हास्यास्पद होतें, त्याहीपेक्षां नारोपंतांचें हें कृत्य जास्त हास्यास्पद आहे, असें म्हटल्यावांचून मला राहवत नाहीं. 'आधीं केलें मग सांगितलें' या केळकरांच्या अभिप्रायावरून प्रतिभासाधनाचें स्वतंत्र कर्तृत्व कसें ध्वनित होतें हें फडक्यांनीं वाटल्यास अजूनहि स्पष्ट करावें. इतकेंच काय, 'प्रतिभासाधन' हें फडक्यांच्या स्वतंत्र कर्तृत्वाचें फळ आहे असा केळकरांच्या हातचा स्पष्ट अभिप्राय उपलब्ध असेल, तर फडक्यांनीं तो अद्यापहि प्रसिद्ध करावा असें त्यांना माझें आग्रहपूर्वक सांगणें आहे. 'आधीं केलें मग सांगितलें' या वाक्याचा ( फडक्यांनीं ) आधीं ( परस्वापहरण ) केलें ( आणि ) मग ( लोकांनीं तें उच्च स्वरानें ) सांगितलें, असाहि अर्थ लावतां येण्यासारखा आहे! इतरांनीं प्रथम उपयोगांत आणलेल्या व्याख्या आणि सिद्धांत वापरतांना आपली उसनवारी कबूल करणें हें कृत्य कदाचित् उपेक्षणीय ठरेल, पण उसनवारीचा मुद्दा

निघाला असतांनाहि तो प्रांजलपणें कबूल करण्याऐवजीं उद्दामपणें नाकबूल करणें यालाच उचलेगिरी म्हणतात. नारोपंतांनीं आपल्या स्वतःच्या बचावासाठीं पुढें केलेले मुद्दे अशा प्रकारें सर्वस्वीं संभ्रमात्मक, सदोष आणि शिळपट असल्यामुळें, ' प्रतिभासाधन ' समितीनें त्यांच्या विरुद्ध जो एकमुखी निर्णय दिला तो नुसता योग्यच नव्हे, तर सर्वस्वीं अपरिहार्य होता हें ( एकट्या नारोपंतांवाचून ) कोणीहि नाकबूल करणार नाहीं. आपण जी सभा ' जिंकली ' असें नारोपंत अद्यापहि समजत आहेत त्या ' जिंकलेल्या सभेनें 'च त्यांच्या कपाळीं एक जोरदार लगुडप्रहार केला. या लगुडप्रहारामुळें त्यांच्या कपाळावर झालेली जखम इतकी खोल आहे कीं, ती भरून काढण्यासाठीं 'साहित्यसेवेंतील स्मृतीं' ची सबंध रद्दी जरी त्यांनीं उपयोगांत आणली तरी तिचा कांहींहि उपयोग होणार नाहीं.

---

## ' अधिकारी कीं अनधिकारी ? ' : ७

"I have gained the consolation of having discovered a deceiver." —Oliver Goldsmith.

' प्रतिभासाधन ' वादाचा आणि तद्विषयक फडकेकृत दडपेगिरीचा परामर्ष घेतल्यानंतर आतां प्रोफेसर मजकुरांच्या विवक्षित स्वभावधर्मावर थोडासा प्रकाश पाडून ' प्रतिभासाधन ' प्रकरणाचा समारोप करणें उचित आहे.

अधिकारी यांच्यासंबंधीं फडक्यांनीं केलेला तुच्छतापूर्वक आणि खोडसाळ उल्लेख वाचून अधिकाऱ्यांबद्दल फडक्यांना अगदीं शिसारी आली आहे असेंच एखाद्याला वाटेल. येन केन प्रकारेण प्रसिद्धि मिळवूं पाहणारा, विकतचीं श्राद्धें घेऊन फुकट तर्पण करीत बसणारा, तमासगीर वृत्तीच्या

पुणेकर विद्वानांची कोंबडीं झुंजवून अधूनमधून करमणूक करणारा व साहित्यप्रान्तांत अनधिकारीपणानें लुडबुडणारा, असा हा एक मनुष्य असावा, अशीच अधिकारी यांच्यासंबंधीं कोणाचीही कल्पना होईल. ज्या अधिकाऱ्यांबद्दल फडक्यांनीं आज असे तुच्छतापूर्वक उद्गार काढले आहेत, त्याच अधिकाऱ्यांच्या घरीं लाचारी पत्करून आणि नाक मुठींत धरून दहा वर्षांपूर्वी फडके गेले होते, इतकेंच नव्हे, तर १८–११–३२ रोजीं —म्हणजे इतिहासमंदिरांतील सभेच्या आदल्याच दिवशीं—कोल्हापुराहून त्यांनीं अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणें एक तार केली होती. " Attending meeting meet you morning. Phadke"—या तारेंतील मजकुरांत meet you morning असे शब्द आहेत. meet me morning असे शब्द नाहींत. तारेंतील या मजकुरावरून कोण कोणाला भेटण्याकरतां उत्सुक होतें हें सुज्ञांना विशेष सांगणें नलगे. ता. १९–११–३२ च्या ज्ञानप्रकाशांत पांचव्या पानावर प्रसिद्ध झालेली बातमी वाचणेंही अगत्याचें आहे.

" प्रतिभासाधनच्या वादाबद्दल श्री. अधिकारी यांनीं शनिवार ता. १९ रोजीं पुणें येथें बोलावलेल्या सभेस प्रो. ना. सी. फडके हे हजर राहणार आहेत. "

फडक्यांनीं दिलेल्या हकीगतीशीं तारेंतला आणि ज्ञानप्रकाशांतला मजकूर ताडून पाहिला म्हणजे सभेला येणार असल्याबद्दल अधिकाऱ्यांना आपण सूचना दिली नव्हती—आपल्याला पाहिल्याबरोबर अधिकारी व इतर कांहीं लोकांचे चेहरे पडले इत्यादि कथाभाग हा फडकेकृत कादंबरींतील एक काल्पनिक उतारा असून प्रत्यक्ष घडलेली सत्यकथा किती निराळी होती, हें ताबडतोब ध्यानांत येईल. त्याचप्रमाणें इतिहासमंदिरांतली ती सभा पार पडल्यानंतर फडक्यांनीं अधिकाऱ्यांना २१–११–३२ रोजीं कोल्हापुराहून लिहिलेल्या पत्राचा पूर्वभाग कसा होता तेंहि पाहाण्यासारखें आहे.

" Dear Mr. Adhikari.

This is to thank you again for all the sincerity and earnestness with which you held Saturday's

meeting. The meeting served as a very good occasion for me to address a gathering of responsible literateurs and to dispel from their minds all possible doubt as to the value and originality of my book प्रतिभासाधन, As Mr. Atre rightly said the whole credit of a meeting of that nature is yours, and I must therefore express again through this letter my sense of appreciation of your work "

" मीं त्या सभेपुढं हजर राहावं इतकी त्या सभेची योग्यता खचित नाहीं " असें मग्रूर आणि चढेल विधान करणाऱ्या फडक्यांनीं त्या वेळीं त्याच सभेंतील सभासदांसंबंधीं ' ' a gathering of responsible literateurs ' असा उल्लेख केला आहे, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. ही सभा ' न्यायसभा ' असल्याबद्दल फडक्यांनीं त्या वेळीं जाहीर कबुलीही दिली होती.'ज्ञानप्रकाशा'च्या२७-११-३२च्या अंकांत पुण्यांतील या निमंत्रित सभेचा अधिकृत वृत्तांत सभेचे अध्यक्ष दत्तो वामन पोतदार यांच्या सहीनें चौथ्या पानावर प्रसिद्ध झाला आहे, त्यांतील कांहीं वाक्यें मीं मुद्दाम अधोरेखित केलीं आहेत.

" प्रतिभासाधन ग्रंथाबाबत वर्तमानपत्रांतून जो पत्रव्यवहार झाला त्यांत ठरल्याप्रमाणें [ यावरून एकट्या अधिकाऱ्यांनीं अनधिकृतपणें स्वतः-च्या जबाबदारीवर व स्वतःची ' नाचण्याची हौस भागविण्याकरतां ' सभा बोलावली नव्हती, त्याचप्रमाणें हा वाद कानिटकर आणि फडके यांमधला ' खासगी वाद ' नव्हता हेंच सिद्ध होतें. ] रा. अधिकारी यांनीं बोलावलेली विद्वानांची सभा शनिवार ता. १९।११।३२ रोजीं दुपारीं ४ वाजतां भारत इ. सं. मंडळाच्या दिवाणखान्यांत सुरू झाली... ...निमंत्रणावरून प्रो. फडके, रा. प्र. कानिटकर व भा. म. कुलकर्णी हेही हजर होते ... ... प्रो. पोतदार यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें. सभास्थानाचे बाहेर पुष्कळ उत्सुक श्रोत्यांची गर्दी आंत येण्याच्या इच्छेनें उभी होती. अध्यक्षांनीं प्रथम सभासदांचें मत विचारून बाहेरील उत्सुक

श्रोत्यांना शांतपणें राहण्याच्या व कोणतीही गोष्ट बाहेर प्रसिद्ध न करण्याच्या अटीवर बसण्यास परवानगी दिली ... ... नंतर सर्वांच्या संमतीनें अध्यक्षांनीं रा. कानिटकर यांना आपलें म्हणणें पुढें मांडण्यास सांगितलें. तेव्हां रा. कानिटकर यांनीं आपण व कुलकर्णी या उभयतातर्फे रा. कुलकर्णी हेच भाषण करतील असें कळवलें ... नंतर कुलकर्णी यांनीं आपलें भाषण सुरू केलें ... [ ‘ कुलकर्णी उठेनात ’ हें फडक्यांचें विधान साफ खोटें आहे. ] ... रा. कुलकर्णी यांस अध्यक्षांच्या परवानगीनें आपलें म्हणणें मांडण्यास रा. देशपांडे यांनीं मदत केली. ’’

आतां सदरील वृत्तांतांतलें फडक्यांच्या भाषणांतील हें वाक्य पहा. “ आपली ही सभा मी न्यायसभा मानावयास तयार आहें. प्रथम माझी वृत्ति या सभेबाबत खरोखरच संशयित होती. पुढें ती संशय दूर झाला. आपण शिष्टांनीं सभा केली हें उत्तम केलें. ’’ सभा संपत आल्यावेळचा हा अधिकृत वृत्तांत पहा.—

“ अध्यक्ष हे सभासदांचे आभार मानीत असतां रा. अत्रे यांनीं सभेचा हा योग जुळवून आणल्याबद्दल रा. अधिकारी यांचे आभार मानले आणि या क्षणीं तरी मला फडके यांनीं सभा एक प्रकारें जिंकली असें म्हणावें असें वाटतें, इतका त्यांच्या भाषणाचा आपल्या मनावर परिणाम झाला असें बोलून दाखवलें. नंतर अध्यक्षांनीं आपल्या राहिलेल्या भाषणांत रा. अधिकारी यांचे पुन्हां आभार मानून रा. फडके यांचे ठिकाणीं विजयी वक्तृत्व असलें तरी आपण आपलें मन सर्वस्वीं निर्विकार ठेवलें आहे. कोणी जिंकलें किंवा कोणी हरले असा कांहींच भाव आपण ठेवला नाहीं; सभेच्या पूर्वी आपण जसे शांत होतों, तसेंच आतांही आहोंत असें सांगून त्यांनीं सर्वांचे आभार मानले. ’’ ता. २०–११–३२ च्या ज्ञानप्रकाशांत या सभेचा जो वृत्तांत प्रसिद्ध झाला आहे, त्यांत सभेंतील गर्दीसंबंधीं असा उल्लेख आहे. “ एकंदर श्रोतृवर्गाची संख्या सुमारें १५० पर्यंत होती. ’’

फडक्यांनीं दहा वर्षांनंतर दिलेला याच सभेचा वृत्तांत, त्यांनीं केलेली मल्लिनाथी आणि मीं दोन्हीं वृत्तांतांत अधोरेखित केलेलीं वाक्यें पाहिलीं, म्हणजे त्या सभेला गर्दी किती होती, अत्र्यांच्या हातून ‘ पंचायतीच्या

नेमणुकीचाच पर्यायानं निषेध ’ झाला कीं काय, प्रो. पोतदारांनीं ‘लगबगीनं उठून’ ‘अत्र्यांच्या स्वयंस्फूर्त उद्गारांवर निःपक्षपाती थंडाईचा बोळा ’ खरोखरच फिरवला का, या सर्व शंकांचें निरसन होऊन फडक्यांच्या अट्टल थापेबाजीबद्दल प्रत्येकाची पूर्ण खात्री होईल.

‘ अधिकाऱ्यांना खासगी सभा बोलावण्याचा अधिकार नसल्यामुळें त्यांनीं या उपक्रमाची खटपट करूं नये. कोणाही त्रयस्थानें उठावें व मला लवादापुढें बोलवावें हें योग्य नव्हे ’ अशी गुरगुर करून दूर पळूं पाहणाऱ्या फडक्यांच्या गळ्यांत सांखळी-पट्टा अडकावण्याचें काम अधिकारी यांनीं मोठ्या शिताफीनें पार पाडलें. ही जाणीव फडक्यांच्या मनांत सतत डांचत असल्यामुळें ते अधिकाऱ्यासंबंधीं आतां वाटेल तसे अनुदारपणाचे उद्गार काढीत आहेत. इतिहाससंशोधन मंडळाच्या इमारतींत भरणाऱ्या सभेची जमवाजमव अधिकाऱ्यांनीं इतक्या चिकाटीनें आणि धडाडीनें केली कीं, ती सभा भरूं नये म्हणून फडक्यांनीं केलेलीं सर्व कारस्थानें फुकट गेलीं. ती सभा भरणार असल्याबद्दलच्या खात्रीलायक बातम्यांचे पडसाद ज्ञानप्रकाशामार्फत ज्या वेळीं फडक्यांच्या कानांवर येऊन आदळले, तेव्हां मात्र फडक्यांचें धाबें दणाणलें. ‘ मी त्या सभेपुढें हजर रहावें इतकी त्या सभेची योग्यता खचित नाहीं ’ असें म्हणून नाकानें कांदे सोलणारे फडके नाक मुठींत धरून त्या सभेपुढें हजर कां राहिले ? ज्या सभेसंबंधीं त्यांचें मन इतकें साशंक होतें, त्या सभेला ‘ न्यायसभा ’ मानण्याची आवश्यकता फडक्यांना कां वाटली ? ‘ मन मानेल त्याप्रमाणें यथेच्छ बोलून ’ घेण्याची संधि सभेंतील सभासदांना न देतां ती सभा जिंकण्याच्या इराद्यानें मी तेथें गेलों, असें फडके आतां सांगत असले तरी असें करण्यांत त्यांचा अंतस्थ हेतु अगदींच निराळा होता, हेंच मला उघडकीस आणायचें आहे. आपल्या पुस्तकाविरुद्ध या सभेनें एकमुखी निर्णय दिला तर त्या निर्णयाचा परिणाम वाट चालून येत असलेल्या भोजराज बक्षिसावर होऊन तें बक्षिस जागच्या जागींच गारद होईल ही भीति फडक्यांना वाटत होती. म्हणूनच फडके मोठ्या तांतडीनें आणि अजीजीनें त्या सभेसमोर येऊन उभे राहिले. याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे ती सभा संपल्यानंतर त्यांनीं अधिकाऱ्यांना लिहिलेल्या पत्राचा पुढें दिलेला हा उत्तरार्ध.

I have also to remind you that you will please lose no time in issuing a joint statement over the signatures of those who were invited for Saturday's meeting, saying that apart from the findings of the Committee with regard to the specific point of the relation of Pratibhasadhan and Hamilton's book, all are definitely agreed that my book deserves to be called the book of the year and therefore there need be no doubt whatever as regards its being awarded the Bhojraj Prize......I have to request you to move in the matter immediately, and to see that the statement is soon issued in the Press—the Dnyan Prakash as well as Sakal.

Hope you'll excuse me for the trouble

Awaiting your letter
Your sincerely
(Sd.) N. S. Phadke.

या पत्रावर विशेष भाष्य करण्याची गरज आहे, असें मला बिलकूल वाटत नाहीं. 'प्रतिभासाधन'वाद सुरू होण्याच्या अगोदरच फडक्यांच्या पुस्तकाला बक्षिस द्यावें असा निर्णय भोजराज पारितोषिक समितीनें जाहीर केला होता. या वादानंतर एकदां दिलेला निर्णय मागें घेऊन बक्षिसाची रक्कम थोपवून ठेवणें बक्षिस-समितीच्या इभ्रतीस कमीपणा आणणारी असल्यामुळें 'प्रतिभासाधन' पुस्तकाला भोजराज परितोषिक मिळालें तरी 'प्रतिभासाधन समिती' नें निःपक्षपाती निकाल देऊन त्या पुस्तकावर "चोरीचा माल" असा राजरोसपणें शिक्का मारला. त्यामुळें 'गड आला पण सिंह गेला' या चालीवर 'बक्षिस आलें पण नांव गेलें' अशी स्थिति होऊन या साहित्याचार्यांच्या पदरांत साहित्यचौर्याचें माप

आतां इतिहासजमा झाल्या असल्या तरी त्या गोष्टींचा इतिहास सांगतांना नारोपंत फडके आपल्या हीनवृत्तीचें जें प्रदर्शन करीत आहेत तें पाहिलें म्हणजे मनस्वी चीड येते.

१९३२ सालीं ज्या अधिकाऱ्यांनीं ते इतके अजीजीनें वागले त्याच अधिकाऱ्यांसंबंधीं तुच्छतेचे उद्गार काढून त्यांची आज वाटेल तशी ते नालस्ती करीत आहेत. 'प्रतिभासाधना' च्या बाबतींत स्वतः केलेलें चौर्यकर्म लपवण्यासाठीं दुसऱ्यांच्या नांवानें हांकाट्या पिटण्याचें हें तंत्र पाहिलें म्हणजे शर्विलकाच्या चौर्यकर्माबद्दल चारुदत्तानें काढलेल्या उद्गारांची आठवण होते. "चौर्यकर्मांतहि इतकी निपुणता असते तर!" या उद्गारांबरहुकूम पण भिन्न आशयाचे असे जे उद्गार साहित्यसेवेंतील स्मृतीबद्दल कोणाहि सहृदय वाचकाच्या तोंडून आपोआप बाहेर पडतील ते असे. "साहित्यकर्मांतहि इतकी हीन वृत्ति असूं शकते तर!".

---

## बालिष्टर "पांड्या" : : : ८

Some men are very shy and reserved when they have an occasion to talk of themselves. So some one else must speak for them to develope their individuality."

**—Anonymous**

आधुनिक मराठी ललित वाङ्मयाच्या क्षेत्रांतील आद्य गुरूच्या गादीवर बसून साहित्यमांडलिकांकडून मुजरे मिळविण्याचा मान कांहीं काळ संपादन करणाऱ्या नारोपंत फडक्यांनीं स्वतःच्या "असामान्य प्रतिभासामर्थ्यानें आणि असाधारण तेजोबलानें" अखिल भारतीय राजकारणाच्या नभोमंडळावर एके काळीं 'एकमेवाद्वितीयं' असें स्थान प्राप्त करून घेतलें होतें, ही गोष्ट कदाचित् सांगून सुद्धां खरी वाटणार नाहीं.

जवळजवळ तेवीस वर्षांपूर्वीची गोष्ट. असहकारितेच्या चळवळीचें रणशिंग फुंकून, आणि सरकारी–निमसरकारी शिक्षणसंस्था, कायदेमंडळें, न्यायालयें, विदेशी माल इत्यादींवर बहिष्काराचें शस्त्र उपसून प्रस्थापित सरकारशीं उघड उघड सामना देण्याचा मनसुबा गांधींनीं नुकताच जाहीर केला होता ! देशांतील कर्तबगार आणि धाडसी स्त्री–पुरुषांच्या कसोटीची वेळ येऊन ठेपली होती. अशा ऐन धामधुमीच्या काळांत सर्वस्व पणाला लावून व हातीं सतीचें वाण घेऊन तिरंगी झेंड्याभोंवतीं निधड्या छातीनें जे लोक गोळा झाले होते, त्यांत नारोपंत फडके यांना अग्रेसरत्वाचा मान दिला पाहिजे ! कारण, गांधींना बाह्यात्कारी सामील होणाऱ्या व्यक्तींच्या खोगीरभतीपेक्षां गांधींच्या चळवळीशीं एकनिष्ठपणें तद्रूप होणाऱ्या व्यक्तींच्या संख्याबलावरच त्या आध्यात्मिक चळवळीची यशस्विता जास्त अवलंबून होती. लोकमान्य टिळकांचीं मुखपत्रें म्हणून ' केसरी ' 'मराठा' या पत्रांकडे लोकांचें लक्ष त्या वेळीं फार होतें. ' केसरी ' चे त्या वेळचे संपादक श्री. तात्यासाहेब केळकर गांधींना " नुसते सामील झाले होते;" पण त्यांच्या चळवळीशीं तद्रूप झाले नव्हते ! त्या चळवळीच्या यशाविषयीं किंचित्‌हि संशय मनांत न आणतां व तिच्यांतील बहिष्काराच्या कार्यक्रमाबद्दल कोणताहि संकोच न बाळगतां जर कोणी चळवळींत उडी घेतली असेल, तर ती नारोपंत फडक्यांनींच ! कोणत्याहि गोष्टींत "व्यवहार्यतेवर नजर ठेवणारी केळकरांची दृष्टि आणि गांधींची लहरी वृत्ति व मनाची अनिश्चित अवस्था, " यांमुळें मनस्वी चीड येऊन नारोपंतांनीं अखेर राजकारणांतून आपलें अंग काढून घेतलें नसतें, तर आजच्या बिकट परिस्थितींत राष्ट्राचें राजकीय नेतृत्व पत्करण्यासाठीं अखिल भारतीय जनतेनें आपली भिस्त एकाच व्यक्तीवर–आणि तीहि अगदीं एकमतानें–ठेवली असती-ती व्यक्ति म्हणजे नारबा फडके !

आपण गांधींच्या चळवळींत कसें शिरलों आणि नंतर मनस्वी चीड आल्यामुळें देशाच्या राजकारणांतून कायमचे कसे बाहेर पडलों, यासंबंधींचा त्रोटक इतिहास नारोपंतांनीं आपल्या ' साहित्यसेवेंतील स्मृतीं'त दिला असला, तरी केवळ विनयातिरेकामुळें त्यांच्या हातून कांहीं गोष्टींवर पडावा तितका स्पष्ट प्रकाश पडला नाहीं ! कारण, " महात्मा " नारोपंत

फडके हे इतक्या विनयशील आणि प्रामाणिक वृत्तीचे सद्‌गृहस्थ आहेत कीं, स्वतःच्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचे प्रसंग सांगण्याचा प्रसंग ज्या ज्या वेळीं त्यांच्यावर येऊन ठेपतो त्या त्या वेळीं त्यांच्या अंगच्या अभिजात शालीनतेमुळें त्यांची चित्तवृत्ति बरीच बावरल्यासारखी होते. अशा बावरलेल्या मनःस्थितींत त्यांच्या तोंडून पुष्कळदां सत्याऐवजीं सत्याभास किंवा सत्यापलाप अहेतुकपणें निर्माण होत असतात. मी त्यांना याबद्दल मुळींच दोष देऊं इच्छित नाहीं. मोठ्या माणसांच्या हातून आत्मकथनाच्या वेळीं असले क्षुल्लक प्रमाद घडणें अगदीं अपरिहार्य असतें. सामान्य शिष्टाचारांच्या बंधनामुळें आत्मकथनाचें कार्य साधारणतः दुष्करच होत असतें त्यांतून जात्याच विनयशील असणाऱ्या व्यक्तीला तर तें जास्तच दुष्कर आणि असह्य वाटत असतें. त्यामुळें त्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची इतरांना पूर्णांशानें कल्पना येणें जवळजवळ अशक्यप्राय होतें आणि म्हणूनच त्या विनयशील व्यक्तींच्या तोंडून बाहेर पडणाऱ्या अस्फुट सत्योद्गारांची पूर्तता खासगी माहितीच्या पुस्तीनें करणें आवश्यक असतें.

सबब नारोपंतांनीं जरा हात राखून केलेल्या कांहीं विधानांना माझ्या स्वतःच्या माहितीची पुस्ती जोडून नारोपंतांच्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार करण्यास मी थोडासा हातभार लावणार आहे.

( १ ) " १९२० च्या नोव्हेंबर महिन्यांत न्यू पूना कॉलेज सोडून ' केसरी ' संस्थेंत दाखल झाल्यावर एकीकडे टिळक राष्ट्रीय विद्यापीठांत अध्यापकाचें काम विनावेतन करून मी ' केसरी ' संस्थेंतील जबाबदारी संभाळूं लागलों. "

वस्तुस्थिति अशी होती कीं, लोकमान्य टिळकांच्या पश्चात् महाराष्ट्राच्या राजकारणाचें नेतृत्व पत्करून ' केसरी 'संस्थेची जबाबदारी संभाळणारा टिळकांच्या तोलाचा असा एकहि मनुष्य तात्यासाहेब केळकर किंवा बाबुराव गोखले यांच्या दृष्टिपथांत नव्हता. टिळकांच्या पश्चात् तीन महिने आपण कसेंबसें करून हीं दोन पत्रें चालविलीं; पण यापुढें निभणें कठिण असें त्या उभयतांनाही वाटूं लागलें. मराठी आणि इंग्रजी भाषांवर सारखेंच प्रभुत्व असणारा, त्या दोन्ही भाषांतून अस्खलित वक्तृत्व करणारा व सफाईदार लेख लिहिणारा आणि महाराष्ट्राच्या राजकारणाचीं सूत्रें हातीं

घेणारा असा टिळकांच्याच योग्यतेचा कोणी मनुष्य मिळाल्यास त्या मनुष्याच्या अंगावर राजकारणाची आणि 'केसरी' संस्थेची सर्व जबाबदारी टाकून दोघेहि सेवानिवृत्त होण्याच्या विचारांत होते. इतक्यांत नारोपंत फडके न्यू पुना कॉलेज सोडून देऊन चळवळीशीं तद्रूप होण्याच्या विचारांत असल्याची कुणकुण त्या उभयतांच्या कानांवर आली. टिळकांचें चरित्र लिहिण्याचा मनोदय नारोपंतांनीं टिळकांजवळ व्यक्त करतांच स्वतःच्या आयुष्यांतील घडामोडींचीं टांचणें देण्याकरितां टिळक आपण होऊन नारोपंतांच्या घरीं जात असत. नारोपंतांशीं सहजासहजीं झालेल्या परिच-याच्या या अलभ्य लाभामुळें टिळक स्वतःला धन्य समजत असत; इतकेंच नव्हे, तर 'माझ्या पश्चात् केसरी संस्था चालवून राजकारणाची धुरा खांद्यावर घेणारा माझ्यापेक्षांहि सरस योग्यतेचा एक मनुष्य मला आढळला' असें नारोपंतासंबंधीं गौरवपूर्ण उद्गार त्यांनीं बाबासाहेब विद्वांस यांच्यापाशीं काढले होते असें सांगतात. टिळकांनीं विद्वांसांजवळ काढलेल्या उद्गारांची एकाएकीं आठवण झाल्यामुळें स्वतः तात्यासाहेब केळकर बाबुराव गोखल्यांना बरोबर घेऊन नारोपंतांच्या घरीं गेले व मुद्दाम भेट घेण्याचें कारण त्यांनीं नारोपंतांच्या कानांवर घातलें. टिळक राष्ट्रीय विद्यापीठांत अध्यापनाचें काम करून 'केसरी' संस्थेची सर्व जबाबदारी पत्करण्या-करितां त्यांनीं नारोपंतांना महिना दोन हजार रुपये देऊं केले होते असें म्हणतात. पण 'अध्यापनाचें किंवा लेखनाचें काम म्हणजे सरस्वतीची सेवा. सरस्वतीच्या सेवेबद्दल वेतन घेणें ही गोष्ट मी अत्यंत तुच्छ मानतों. हें सर्व काम विनावेतन करण्याची माझी अट तुम्हांला मान्य होत असेल तरच तुमची ही निकडीची विनंति मी मान्य करीन' असें नारोपंतांनीं त्यांना स्पष्ट शब्दांत सांगितलें. थोड्याशा विचारविनिमयानंतर नारोपंतांची ही अट त्या उभयतांनीं मान्य केली. त्यांच्याकडून ही अट मान्य झाल्या-नंतरच नारोपंतांनीं न्यू पूना कॉलेजच्या नोकरीवर लत्ताप्रहार केला. नारोपंतांनीं केलेल्या अतुल स्वार्थत्यागाचा हा असा इतिहास आहे.

२ " मराठा पत्रांत मात्र मी खूपच लिहीत असें. त्या पत्राचे संपादक बाबुराव गोखले प्रचारकार्यांत इतके गुंतलेले असत कीं, बहुतेक प्रत्येक अंकाचं लेखन व संपादन मलाच करावं लागे. पुष्कळदां असं होई कीं,

रविवारीं प्रसिद्ध होणारा 'मराठा'पत्राचा अंक छपाईच्या यंत्रावर चढलेला असतांना बाबुराव कुठल्या तरी परगांवचं व्याख्यान आटपून येत, व 'काय फडके, ठीक आहे ना? अंक तयार?' असं विचारीत आणि मीं 'आलबेल' दिली कीं घरीं निघून जात...'केसरी' कचेरींत काम करूं लागल्यानंतर थोड्याच दिवसांत मला कळून चुकलं कीं, एखाद्या घरांत धर्मार्थ बाळगलेल्या बिनवारशी पोराची जशी अवस्था असावी तशीच 'केसरी' कचेरींत 'मराठा' पत्राची होती...त्याकडे विशेष आस्थेनें लक्ष द्यावं असं जबाबदार व्यक्तींपैकीं कुणालाहि वाटत नव्हतं."

टिळकांच्या पश्चात् केवळ तीनच महिन्यांनीं 'केसरी' कचेरींत कशी बेबंदशाही माजली तें पाहा! त्यांतल्या त्यांत 'केसरी' संस्थेच्या संचालकांनीं एवढ्या अल्पावधींत 'मराठा'पत्राची किती दैन्यावस्था करून टाकली होती ती तर विचारूंच नका. त्या पत्राला शेवटची घरघर लागून त्याच्या नाड्या जवळजवळ आंखडतच चालल्या होत्या. पण संचालकांच्या सुदैवानें नारोपंतासारखा धन्वंतरी त्यांना ऐन वेळीं लाभला, म्हणूनच 'मराठा'पत्रावरचें हें गंडांतर टळलें. नाहीं तर त्या पत्राचें नांव लोकांना आज ऐकूंहि आलें नसतें. बाबुराव गोखले 'मराठा'पत्राची निदान चौकशी करण्याकरितां—शनिवारीं रात्रीं का होईना—कचेरींत पाऊल तरी टाकीत असत; पण नारोपंतांसारखा करडा लेखक, मुरब्बी संपादक आणि राजकारणधुरंधर हाताशीं असल्याची जाणीव असल्यामुळें तात्यासाहेब केळकर तर 'केसरी' कचेरीकडे कधीं ढुंकूनहि बघत नसत, असें ऐकिवांत आहे. त्यामुळें छपाईच्या यंत्रावर 'मराठा' चढला, कीं हा 'तेजस्वी ब्राह्मण' 'केसरी'चें सबंध लेखन करण्याकरितां सिगारेट शिलगावून खुर्चीवर जाऊन बसत असे, आणि 'मराठा'पत्राची छपाई पुरी होण्याच्या आंत पुढच्या 'केसरी'चा अग्रलेखासकट सर्व मजकूर एका दमांत (सिगारेटच्या नव्हे) लिहून काढीत असे! मंगळवारीं पहाटे तात्यासाहेब केळकर कुणाला तरी 'केसरी' कचेरींत नारोपंतांकडे पाठवीत असत आणि त्याच्यामार्फत विचारीत असत 'काय फडके, ठीक आहे ना? 'केसरी' छापून तयार?' अन् नारोपंतांकडून 'आलबेल' आली, कीं ते अगदीं शांतपणें झोंपत असत. पुष्कळदां असें होई कीं 'केसरी' कचेरींत कोणीच हजर

नसल्यामुळें (रजेची चिठी न पाठवतां पुष्कळ लोक गैरहजर राहत आणि नंतर गैरहाजिरीचा खुलासा करीत,) 'केसरी' आणि 'मराठा' या दोन्ही पत्रांच्या लेखनाचा बोजा एकट्या नारोपंतांवर पडत असे. हीं कामें वेळेवर पार पडावींत म्हणून अशा अडचणीच्या प्रसंगीं एकाच वेळीं एका हातानें 'केसरी'चा मराठी मजकूर आणि दुसऱ्या हातानें 'मराठा'पत्राचा इंग्रजी मजकूर नारोपंत बसल्या बैठकींत लिहून काढीत असत, असें सांगतात.

(३) "'मी मराठा' पत्रांतील माझं लिखाण शक्य तितक्या उच्च दर्जाचं व्हावं अशी काळजी घेऊं लागलों. माझं इंग्रजी चांगलं होतं खरं; परंतु 'मराठा' पत्रांतलीं मतं म्हणजे टिळक पक्षाचीं मतं समजलीं जातात, आणि त्यांतले लेख महाराष्ट्रीय इंग्रजी कसं लिहितात त्याचा नमुना गणला जातो, या जाणीवेमुळं माझ्यावर फार मोठी जबाबदारी आहे असं मला वाटे; आणि 'मराठा' पत्रांतील अग्रलेखांत व स्फुटांत माहितीची सखोलता, देशभक्तीचा आवेश, यांबरोबर इंग्रजी भाषेची सफाई, तिच्यांतील स्वभावसुलभ उपहासात्मक विनोद इत्यादि गुणहि दिसून आले पाहिजेत अशी मनाशीं महत्त्वाकांक्षा ठेवून मी प्रत्येक लेख लिहितांना फार परिश्रम घेऊं लागलों." (पांड्या, पांड्या, तूं 'प्रोफेश्वर' होण्याऐवजीं 'बालिष्टर' रे कां नाहीं झालास?)

नारोपंतांचा 'केसरी', 'मराठा' पत्रांशीं जो चार-पांच महिन्यांचा संबंध जडला होता, तेवढ्या अल्पावधींत त्यांनीं स्वतःच्या प्रतिभा-संपन्नतेच्या जोरावर त्यावेळच्या वृत्तपत्रसृष्टींत जेवढे चमत्कार घडवून आणले, त्या सर्वांचा इतिहास (अर्थात् माझ्या माहितीप्रमाणें) मी देत बसलों तर 'प्रतिभासाधना'एवढा ग्रंथ निर्माण होईल. अगदीं थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'मराठा' पत्रांतील अग्रलेखांत आणि स्फुटांत नारोपंतांनीं दाखविलेली 'माहितीची सखोलता' 'देशभक्तीचा आवेश' आणि यांबरोबरच ठळकपणानें दिसून येणारी त्यांच्या 'इंग्रजी भाषेची सफाई' इत्यादि एकापेक्षां एक असे वरचढ गुण सुसंस्कृत जन-तेच्या दृष्टोत्पत्तीस येतांच Times of India चा खप इतका खालावला कीं तें पत्र इतःपर तोट्यांत चालवण्यापेक्षां कायमचें बंद करून टाकावें

कीं काय या गंभीर प्रश्नाचा खल बेनेट कोलमन कंपनीच्या डायरेक्टर वर्गांत चालू होता. कोणी असेंहि सांगतात कीं याच डायरेक्टर मंडळींनीं नारोपंतांना दरमहा पांच-सहा हजार रुपये पगार देऊं करून त्यांना ' केसरी ' संस्थेंतून फोडून Times of India च्या मुख्य संपादकाच्या जागेवर नेमण्याची खलबतेंहि चालवलीं होतीं; पण स्वतःच्या मनगटावर बांधलेलें देशभक्तीचें आणि स्वार्थत्यागाचें कंकण शाबूत राखण्याकरितां नारोपंतांनींहि येवढ्या मोठ्या पगाराची जागा क्षणाचाहि विचार न करतां तुच्छतापूर्वक नाकारली.

( ४ ) " स्वतःच्या बुद्धीनं माझं मींच घेतलेल्या या शिक्षणापलीकडे ' केसरी ' कचेरींत मला शिक्षण, मार्गदर्शन अगर प्रोत्साहन मिळालं नाहीं. श्रीयुत बाबुराव गोखले माझ्याशीं अगदीं खेळीमेळीनं वागत व कचेरींत त्यांची माझी क्वचित् गांठ पडली तर प्रचलित विषयावर पुष्कळच चर्चा करीत. परंतु ते माझ्या आधीं कित्येक वर्षे ' केसरींत ' दाखल झाले होते, व ज्येष्ठ व्यक्तींच्या पुढ्यांतले होते. यापलीकडे मी मनानं त्यांची श्रेष्ठता मानीत नव्हतों. मला त्यांच्यापासून कांहीं शिकायचंच नव्हतं...श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याशीं चार शब्द बोलण्याची वेळ तर क्वचितच येई. "

याला म्हणावं स्वयं–शिक्षण आणि स्वावलंबन ! बाबुराव गोखले नारोपंतांच्या आधीं किती तरी वर्षे ' केसरी ' संस्थेंत होते. पण उपयोग काय ? राजकारणाचीं आणि संपादकीय तंत्राचीं मूलतत्त्वेंहि त्यांना अवगत नव्हतीं. प्रचलित विषयावर चर्चा करण्याच्या मिषानें ते जेव्हां या स्वयंभू संपादक महाशयांची गांठ–भेट घेऊं लागले, तेव्हां त्यांना या बाबतींतला पुसट पुसट साक्षात्कार होऊं लागला ! या बृहस्पतितुल्य गुरुवर्यांच्या प्रसादयुक्त वाणींतून झरणाऱ्या राजकारणविषयक गंगौघाचे एक दोन गडू भरून घेऊन आजूबाजूच्या खेड्यापाड्यांतील लोकांना पुनीत करण्यासाठीं व्याख्यानाच्या मिषानें बाबुराव जे एकदां पसार होत असत ते शनिवारीं मध्यरात्रीं–'मराठा'पत्राचा अंक छपाईच्या यंत्रावर चढला कीं–भीत भीत कचेरींत पाऊल ठेवीत असत ! नारोपंतांनीं स्वतःच्या हिंमतीवर कमावलेल्या राजकारणविषयक ज्ञानाच्या दैदीप्यमान विश्वरूपदर्शनानें विस्मित झालेल्या

बाबूरावांच्या मनांत न्यूनगंड उत्पन्न होणें साहजिकच होतें. त्यामुळें या प्रतिभासंपन्न महापुरुषाशीं सलगी वाढवण्यासाठीं जरा खेळीमेळीनें-पण बरेंच जपून ते वागत असत आणि या आत्मज्ञानी विभूतीचा कल संभाळून जेवढें शिकतां येईल तेवढें शिकण्याचा प्रयत्न करीत असत. बाबुराव गोखल्यांनीं महत्प्रयासानें मिळाविलेली ही विद्या बिचाऱ्या तात्यासाहेब केळकरांच्या वांट्याला मात्र क्वचितच येत असे. 'केसरी' कचेरींत ते नियमितपणें कधीं येतच नसत. त्यामुळें या 'नारायणी' वाणीचा अलभ्य लाभ वांट्याला येण्याचें सद्भाग्य त्यांना कधींच लाभलें नाहीं. दुर्दैव त्यांचें!

(५) मी असहकारितेच्या चळवळींत पडलों होतों, तों तिच्या यशाविषयीं किंचितही संशय मनांत न ठेवतां व तिच्यांतील बहिष्काराच्या कार्यक्रमाबद्दल कोणताही संकोच न बाळगतां. 'केसरी' पक्षाचं धोरण तितकंच असंदिग्ध व निःसंकोच असेल असं मला वाटत होतं; परंतु हा माझा हिशेब चुकला होता, असं वाटण्यासारख्या गोष्टी हळूहळू माझ्या लक्षांत येऊं लागल्या होत्या. केळकर जरी गांधींना सामील झाले होते, तरी चळवळीशीं तद्रूप झाले नव्हते ... ... कोणत्याही गोष्टींत व्यवहार्यतेवर नजर ठेवणारी त्यांची चिकित्सक दृष्टि तद्रूपतेच्या आड येण्यासारखी होती ... ... केळकर चळवळीशीं तन्मय झाले नव्हते ही गोष्ट त्यांचं उणं काढण्याच्या बुद्धीनं मी लिहीत नाहीं; परंतु, त्यांच्या व माझ्या वृत्तींतल्या फरकाचे विचित्र परिणाम होऊं लागले व त्यामुळें माझा विरस झाला हें मला सांगितलंच पाहिजे."

नारोपंतासारखा मोहरा असहकारितेच्या चळवळीशीं अगदीं कायावाचामनें करून तद्रूप झाला असतां तात्यासाहेबांसारख्यांनीं चळवळीशीं एकरूप न होतां अंगचुकारपणा करून मित्रद्रोह आणि देशद्रोह करावा हें त्यांना खास शोभलें नाहीं. या गोष्टीचें शल्य नारोपंतांच्या जिव्हारीं इतकें लागून सुद्धां नारोपंतांनीं त्याबद्दल तात्यासाहेबांना कधींही जाणीव दिली नाहीं, ही गोष्ट नारोपंतांच्या सौजन्याला साजेशीच होती. माझें तर असें मत आहे कीं, देशाच्या हिताच्या दृष्टीनें विचार करतां चळवळीशीं इतक्या एकनिष्ठपणें तन्मय झालेल्या नारोपंतासारख्या राजकारणधुरंधर

माणसाच्या हातीं 'केसरी','मराठा'पत्रांची व त्याचबरोबर राजकारणाचीं सूत्रें हवालीं करून वास्तविक तात्यासाहेब केळकरांनीं त्याच वेळीं सेवा-निवृत्त होणें जरूर होतें. पण व्यवहार्यतेवर नजर ठेवणारी त्यांची चिकित्सक दृष्टि तद्रूपतेच्या आड आल्यामुळें नारोपंतासारखा मुत्सद्दी नेता त्यांना संभाळतां आला नाहीं. त्यामुळें देशाचें केवढें नुकसान होत आहे या गोष्टीची कल्पना तात्यासाहेबांना त्या वेळीं झाली नाहीं. ' देशाचें दुर्दैव ' म्हणतात तें हेंच.

—(६) " पुष्कळदां असं होई कीं सोमवारीं संध्याकाळीं एखाद्या सभेंत मी असहकारितेच्या चळवळीचा आत्यंतिक पुरस्कार करी, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळच्या केसरींत असहकारितेच्या सीमांचं आणि वैगुण्यांचं विवेचन केळकरांनीं केलेलं माझ्या पाहण्यांत येई. ही विसंगति माझ्या मनाला टोंचत राही. ती मला टाळतां येईल असंही चिन्ह मला दिसेना. माझ्या मनांतला विरस सूक्ष्मपणें वाढूं लागला. "

(७) " तरी देखील ' केसरी ' कचेरींतील काम चालूं ठेवण्यांत चिकाटी धरावी असं मला वाटलं असतं; पण याच सुमारास गांधींनीं स्वतःच माघार घेतल्यासारखं चळवळीचं एक पाऊल मागें ओढलं आणि त्यामुळें मात्र आपण यापुढें राजकीय क्षेत्रात राहावं किंवा नाहीं असा विचार मी जोरानं करूं लागला. गांधींनीं शिक्षणसंस्थांवरचा बहिष्कार सोडून दिला. त्या संस्थांत ज्यांना जायचं असेल त्यांनीं जावं अशी परवानगी त्यांनीं जाहीर केली !... गांधींच्या लहरीपणाची व त्यांच्या या स्वभावामुळें त्यांच्या अनुयायांना एकदां या दिशेस तर एकदां त्या दिशेस जावं लागावं या अनिश्चित अवस्थेची मला मनस्वी चीड आली ! मीं राजकीय चळवळींतून अंग काढून घ्यायचं ठरवलं ! आणि आपल्याला यापुढें राजकारणांत राहायचं नाहीं तर ' केसरी 'त तरी आपण कोणत्या नात्यानं राहूं शकतों असं वाटून 'केसरी' कचेरीही सोडण्याचा मीं निश्चय केला ! मीं न्यू पूना कॉलेज सोडलं तेव्हां त्या गोष्टीमुळं जशी खळबळ उडाली, तशीच मीं चळवळींतून अंग काढून घेतल्याचं कळतांच उडाल्यावांचून राहिली नाहीं. " लेचेपेचे आणि

अर्धवट सहकारी दृष्टीस पडतांच, देशोद्धाराचें कंकण बांधून देश-सेवेला उद्युक्त झालेल्या या महात्म्यानें वैतागाच्या भरांत आपल्या हतभागी देशाला " Go to hell " ( नरकांत जा ! ) असा शाप देऊन देशभक्तीच कायमची सोडचिठ्ठी दिली ! असला बाणेदारपणा जगाच्या इतिहासांत नारोपंतांशिवाय दुसऱ्या कोणी दाखवला असेल असें मला वाटत नाहीं. करणार काय बिचारा !

केवळ केळकरांनींच नारोपंतांना दगा दिला असें नव्हे, तर असह-कारितेच्या चळवळीचे आद्य जनक जे गांधी त्यांनींही ' चळवळीचं एक पाऊल मागं ओढून ' आधींच खचून गेलेल्या नारोपंतांच्या काळजावर शेवटचा प्रहार केला ! थोडक्यांत सांगायचें म्हणजे केळकरांनीं पाया घातला आणि गांधींनीं कळस चढवला. त्यामुळें असहकारितेच्या चळ-वळीच्या गौरीशंकर शिखरावर जाण्यासाठीं नारोपंतांनीं कंबर कसली असतां, आपण पायथ्यापासून अवघे शें—दोनशें फूट वर चढून जातों न जातों तोंच गांधींची गठडी वळून ते मागें परतण्याची भ्याड भाषा बोलूं लागल्याचें समजून येतांच, गांधींच्या या घरसोडीचा नारोपंता-सारख्या निधड्या छातीच्या वीराला संताप येणें साहजिक आहे.' नको हें असलें घरसोडीचें राजकारण आणि नको या असल्या कमकुवत काळ-जाच्या माणसाची संगत ! ' असा ठाम विचार करून नारोपंतांनीं त्या दिवसापासून राजकारणाला कायमचा रामराम ठोकला. उभ्या देशावर कोसळणारी ही भावी आपत्ति लक्षांत घेऊन नारोपंतांचा रुसवा काढ-ण्याचा गांधींनीं पराकाष्ठेचा प्रयत्न करून पाहिला. पण रविवर्म्यांच्या ' शकुन्तला—जन्मा 'च्या चित्रांतील विश्वामित्राच्या पवित्र्यांत उभें राहून नारोपंतांनीं गांधींच्या त्या विनवण्यांचा निक्षून अव्हेर केला आणि डॉ. गणपुल्यांच्या आग्रहावरून त्यांनीं एकदम ' मानसोपचार ' लिहायला सुरुवात केली. कारण, माणसाचीं मनें सुधारल्याशिवाय देशाची सुधारणा व्हायची नाहीं हा स्पष्ट दृष्टांत त्यांना झाला. अशा रीतीनें नारोपंतांनीं राजकारणांतून आपलें अंग काढून घेतल्यावर सर्व जगांत किती खळबळ उडाली या गोष्टीचें सविस्तर वर्णन देण्याचें विनयातिशयामुळें नारोपंतांनीं जरी टाळलें असलें, तरी नारोपंतांच्या असामान्य योग्यतेची वाचकांना

कल्पना देण्याकरितां मला तें थोडक्यांत दिलेंच पाहिजे. उभा हिंदुस्थान शोकमग्न झाला ! गांधींनीं लवकरच एकवीस दिवसांचा एक खासगी उपवास सुरू केला ! जपानांत भूकंपाचा एक जोरदार धक्का बसला, ऑस्ट्रेलियन टेस्टमॅच खेळत असलेला ब्रॅडमन पहिल्या चेंडूला चीत झाला ! आणि हिंदुस्थाननें वाट चालत येत असलेलें अखिल भारतवर्षीयांच्या ऐन दृष्टिपथांत आलेलें स्वराज्य त्या भूकंपाच्या धक्क्यानें कुठें तरी दूर–दूर जाऊन दृष्टीआड झालें ! !

माझ्या प्रेमळ वाचकांनो, नारोपंतांच्या असाधारण राजकारणाचा आणि असामान्य देशभक्तीचा हा कल्पनारम्य पूर्वरंग वाचल्यानंतर त्याच संबंधींचा पण वस्तुस्थितिदर्शक उत्तररंग वाचतांना तुमच्या वृत्ति आश्चर्यानें स्तिमित होऊं देऊं नका !

---

## नारोपंतांची स्वरचित विलापिका ! ९

‘ Sir let me speak with you in your chamber. You shall Know how things go; and. I warrant to your content. Here is a letter will say something ’

—Shakespeare

पुरोगामित्वाच्या नांवाखालीं वाटेल ते पाणचट प्रकार करून वर प्रतिष्ठितपणाची शेखी मिरवणाऱ्या या शेख महंमदाच्या बदलौकिकाचा बभ्रा ज्या वेळीं वृत्तपत्रांतून जाहीरपणें होऊं लागला आणि वृत्तपत्रीय हल्ल्यानें जेव्हां यांच्या अब्रूचें चंद्रमौळी खोपटें पार जमीनदोस्त झालें, तेव्हां हे चंदूलाल अत्यंत चिंतातुर झाले. झालें तें होऊन गेलें; पण सफाचाट झालेलें हें अब्रूचें खोपटें उभारण्यासाठीं कांहीं तरी उपाय शोधून काढला पाहिजे असें यांना वाटूं लागलें. राजरोसपणानें आत्मचरित्र लिहावें, तर

असे कोणते असामान्य गुण आपल्या अंगांत आहेत, कीं, त्या गुणांच्या मजबूत पायावर आत्मचरित्राचा इमला आपल्याला उभारतां येईल ? देशभक्ति—स्वार्थत्याग—उज्ज्वल चारित्र्य यांपैकीं एखादा सद्गुण अंशमात्रानें तरी आपल्या शरीरांत कुठें चुकून शिरकाव करून बसला आहे का ? अशा विचारानें हे पुरोगामी महंत स्वतःच्या काळजाचे कप्पे चांचपडूं लागले. त्या वेळीं स्वतःच्या साहित्यसेवेची पुरचुंडी त्यांच्या हाताला लागली. येवढ्याशा तुटपुंज्या भांडवलावर आत्मचरित्राचा डौलदार इमला आपल्याला कसा उभारतां येईल हा प्रश्न त्यांच्या मनांत साहजिकच उभा राहिला, पण त्या बिकट प्रश्नाचें उत्तरहि त्यांना तावडतोब मिळालें! ' आहे—एक गोष्ट अद्याप करतां येण्यासारखी आहे. आपण आजपर्यंत साहित्यसेवा कशी केली, हें सांगण्याच्या मिषानें आत्मचरित्राचे अध्याय जर आपण ' झंकार 'च्या रकान्यांतून क्रमशः प्रसिद्ध केले, तर आपला इष्ट हेतु साध्य होईल. पण हें सर्व काय करण्यासाठीं आपल्याला अशी एखादी युक्ति योजली पाहिजे कीं, जिच्या योगानें आपल्या भोळ्याभाबड्या भगतगणांच्या डोळ्यांसमोर आपल्या स्वतःच्या अंगांत कालत्रयींहि नसलेल्या गुणांचा आभास उत्पन्न करून आत्मचरित्राची हवेली आपल्याला उभारतां येईल. या कार्यांत सुदैवानें आपल्याला यश आलें तर वृत्तपत्रीय सरबत्तीच्या आवाजानें खालावलेली आपल्या तुटपुंज्या अब्रूची पतपेढी पुन्हां एकदां नव्या जोमानें आत्मचरित्राच्या या हवेलींत आपल्याला प्रस्थापित करतां येईल, " असा विचार करून नारोपंत फडके त्या उद्योगाला लागले आणि ' माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति ' अशा नटव्या आणि नकली अक्षरांची कोनशिला बसवून आत्मचरित्राची इमारत उठवायला त्यांनीं तांतडीनें प्रारंभ केला. परंतु नारोपंत फडक्यांच्या आणि त्यांच्याभोंवतीं फेर धरून नाचणाऱ्या त्यांच्या भगतगणांच्या दुर्दैवानें नारोपंतांचा हा अंतस्थ हेतु साध्य झाला नाहीं तो नाहींच. कारण या इमारतीचें बांधकाम करण्यासाठीं अव्वलपासून अखेरपर्यंत परनिंदेचा चिखल वापरण्यांत आल्यामुळें व त्यावर आत्मश्लाघेचा गिलावा चढवून वर थापेबाजीची रंगरंगोटी करण्यांत आल्यामुळें, मोठ्या मिनतवारीनें केलेलें हें बांधकाम अगदीं भकास आणि ओंगळवाणें झालें !

'साहित्यसेवेंतील स्मृतीं'च्या मागें मी म्हणतों तशी मनोवृत्ति नसती—प्रामाणिकपणाच्या मनोभूमिकेवर हें आत्मकथन आधारलें असतें—तर नारोपंत फडक्यांना इतकी थापेबाजी करण्याची आवश्यकता मुळींच भासली नसती. आपण आपल्या कादंबऱ्या कशा लिहिल्या यासंबंधींचें तिखटमीठ लावून पाल्हाळिक वर्णन करतांना आपला ज्या ज्या व्यक्तींशीं कांहीं ना कांहीं कारणामुळें बेबनाव झाला, त्या त्या व्यक्तींची निष्कारण नालस्ती 'साहित्यसेवेंतील स्मृतीं'त करण्याचें त्यांना कांहींच कारण नव्हतें. एखाद्या नर्तकीला उद्देशून केलेल्या कविता किंवा स्वतःला आलेलीं गौरव-पूर्ण पत्रें त्यांच्या आधारावर जर 'साहित्यसेवेंतील स्मृतीं'चीं प्रकरणेंच्या प्रकरणें खरडलीं गेलीं, तर 'केसरी' कचेरींतून स्वतःचा मुक्काम हलवतांना 'केसरी' संस्थेच्या संचालकांना लिहिलेल्या एका महत्त्वाच्या पत्रावर निदान एखादें प्रकरण तरी यायला हवें होतें. (माझ्या मतें नारोपंत फडक्यांच्या त्या पत्राला सबंध फडके वाङ्मयात अत्यंत उच्च स्थान द्यावें लागेल.)

१९२० सालच्या सत्याग्रहाच्या चळवळींत हे गृहस्थ शिरले ते केवळ स्वतःची हुल्लडबाजीची हौस भागविण्याकरितां; अंतरींच्या उमाळ्यामुळें किंवा देशसेवेच्या तळमळीमुळें नव्हे. त्या वेळीं या चिरंजीवांच्या अंगांत जो आवेश संचारल्यासारखा दिसत होता, तो नुसता नाटकी आवेश होता. खुल्या जंगलांत इतस्ततः संचार करून स्वतःच्या हुंकारानें भोंवता-लच्या श्वापदांवर जरब बसवणाऱ्या वनराजाचा तो आवेश नसून वानरा-सारख्या वेड्यावांकड्या उड्या मारून भोंवतालच्या लोकांची करमणूक करण्यासाठीं ताबुतापुढें नाचणाऱ्या वाघाचा तो आवेश होता. खोट्या देशभक्तीचें हींव अंगांत सपाटून भरल्यामुळें उत्पन्न झालेल्या मनाच्या संभ्रमावस्थेंत शाळा—कॉलेजांतील विद्यार्थ्यांना उद्देशून या उत्तर-बाळानें कसा जिभेचा पट्टा चालवला होता व तलवारीचा पट्टा चालवण्याचा प्रसंग येऊन ठेपतांच या वीरविडंबकानें रणांगणांतून कसा पोबारा केला ही गोष्ट माझ्या चांगली स्मरणांत आहे. "तेजस्वी तरुणांनो, तीस—चाळीस रुपड्यांसाठीं सरकारी कचेऱ्यांतून गुलामगिरी करण्याचें शिक्षण देणाऱ्या या शाळा—कॉलेजांत तुम्ही खितपत पडणार, कीं देशाच्या स्वातंत्र्यासाठीं

धगधगलेल्या कुंडांत प्राणांची आहुति देण्याचें राष्ट्रीय शिक्षण घेण्यासाठीं या असल्या शाळा–कॉलेजांवर लाथ मारून त्यांतून तुम्ही बाहेर पडणार !' अशा जळजळीत शब्दांत त्या वेळच्या विद्यार्थ्यांना राणा भीमदेवी थाटांत आवेशपूर्ण सवाल करणाऱ्या या पर्यंकपंडिताचें हें देशभक्तीचें ढींव लवकरच उतरलें ! प्राणांच्या आहुति धगधगलेल्या कुंडांत टाकण्याविषयीं ' परोपदेशे पांडित्यम् ' दाखवणाऱ्या या नकली देशभक्तावर जेव्हां स्वतःच्याच वखवखलेल्या कुंडासाठीं प्राणाहुतींची सोय पाहण्याचा करुणास्पद प्रसंग ओढवला, तेव्हां बाबुराव गोखल्यांच्या मार्फत तात्यासाहेब केळकरांच्या मनधरण्या करून ' केसरी कचेरीं 'त या बहुरूपी देशभक्तानें स्वतःचें सोवळें भांडें आणून टाकलें.

' केसरी ' कचेरींत त्या वेळीं जादा माणसाची जरुरी नसतांही तात्यासाहेब केळकर व बाबुराव गोखले यांनीं केवळ मेहेरबानीखातर यांच्या योग्यतेपेक्षां आणि कामाच्या मानानें जास्त तनखा देऊन या गृहस्थांना ' चिकटवून ' टाकलें. पण उभयतां संपादकांनीं दयार्द्र बुद्धीनें दाखवलेल्या सौजन्याचा या गृहस्थांनीं भलता फायदा घेऊन नेहमींच्या संवयीप्रमाणें फुशारक्या मारायला सुरुवात केली. ' मालकाचें नांव गण्या आणि चाकराचें नांव रंभाजीराव ' अशी जी एक म्हण आहे, त्या म्हणीला अनुसरून हे वाटेल त्या वल्गना करूं लागले. ' केसरी ' संस्थेचे संचालक निवळ नामधारी असून आपणच त्या संस्थेचे खरेखुरे सूत्रधार आहांत–' मराठा ' पत्राची तर फारच आबाळ चालली होती, पण आपण त्या पत्रावर बाळसें चढवलें आणि शेवटच्या घटका मोजीत बसलेलें तें दुर्दैवी साप्ताहिक मृत्यूच्या दाढेंतून ओढून काढलें–केसरी कचेरींत आपलें ' स्वतंत्र टेबल ' असल्यामुळें त्या ठिकाणीं आपली सत्ता अनियंत्रित आहे–असें आवत्याभवत्यांना भासवण्याचा उपक्रम या उपरी उमेदवारानें चालू ठेवला. पण या स्वतंत्र टेबला'चा उपयोग ' केसरी ' किंवा ' मराठा ' पत्रांतील मजकूर लिहिण्यासाठीं होण्याऐवजीं बिनसरकारी, निमसरकारी, पूर्ण सरकारी–मिळेल त्या नोकरीसाठीं अर्ज खरडण्याकडे होऊं लागला ! निमसरकारी किंवा सरकारी शिक्षणसंस्थांवर बहिष्कार टाकण्याविषयीं विद्यार्थ्यांना उपदेश करणारा हा स्वाभिमानी वीर (!)

तशाच प्रकारच्या एखाद्या शिक्षणसंस्थेंत गुलामगिरी पत्करण्यासाठीं लोटांगणें घालूं लागला !

धारकऱ्यांचें सोंग पांघरून 'केसरी' कचेरींत वर्णी लावणाऱ्या या वारकऱ्यानें एके दिवशीं कोणालाहि न कळवतां तेथून आपलें सोंवळें-भाडें आधीं मुकाट्यानें हलवलें आणि नंतर भीत भीत, दबकत दबकत आणि हुंदके देत देत स्वतःच्या लज्जास्पद वर्तनाचा खुलासा पत्ररूपानें करून टाकला. ज्या तत्त्वाच्या पुरस्कारासाठीं न्यू पूना कॉलेज सोडून आपण 'केसरी' कचेरींत आलों, त्या तत्त्वाच्या अगदीं विरुद्ध वर्तन आपल्या हातून घडलें, याउप्पर आपण 'केसरी' कचेरींत पाऊल टाकणें अत्यंत निंद्य होय, इतःपर सार्वजनिक कार्य आपल्याला उजळ माथ्यानें करतां येणें शक्य नाहीं, आपल्यासारखा लांछित मनुष्य 'केसरी'त असणें हें संस्थेच्या व व्यक्तीच्या—दोघांच्याहि दृष्टीनें मुळींच भूषणावह नाहीं अशी स्पष्ट कबुली त्या पत्रांत दिली असतांहि 'केसरी'चीं आणि माझीं राजकीय मतें पटलीं नाहींत, तात्यासाहेब केळकर चळवळीशीं एकरूप झाले नाहींत आणि गांधींनीं चळवळीचें पाऊल मागें ओढून भ्याडपणा दाखवला म्हणून राजकारणाची चीड येऊन मीं 'केसरी' संस्था सोडून दिली, असें कांगावखोरपणानें सांगणारा हा मनुष्य किती बिलंदर थापाड्या असला पाहिजे हें वाचकांच्या ध्यानांत यावें असाच पुरावा मी आतां सादर करणार आहे.

१९२० सालच्या असहकारितेच्या चळवळीबाबत 'केसरी' पक्षाचें धोरण असंदिग्ध व निःसंकोच नसल्याचें आढळून आल्यामुळें आपला फारच विरस झाला, त्यांत स्वतःच्या लहरीपणाची व अनिश्चित अवस्थेची गांधींसारख्या पुढारी म्हणवणाऱ्या माणसानें भर टाकल्यामुळें आपल्याला मनस्वी चीड आली आणि केवळ त्या सात्त्विक संतापाच्या भरांत 'केसरी'तून आणि देशाच्या राजकारणांतून आपण कायमचें अंग काढून घेतलें असा बाहणा करून स्वतःच्या बेगडी देशभक्तीचें आणि पोकळ स्वार्थत्यागाचें प्रदर्शन करणाऱ्या नारोपंत फडके नांवाच्या एका 'बातारामा'नें 'केसरी' संस्थेंतून गुपचूपपणें आपला गाशा कां गुंडाळला या गूढ रहस्यावर मी आतां झगझगीत प्रकाश पाडणार आहें. म्हणून

या थापाड्या माणसाचें खरें स्वरूप उघडकीला आणणारें एक महत्त्वाचें पत्र मी वाचकांसमोर ठेवतों. केसरीचे सहसंपादक श्री. बाबुराव गोखले यांना हें पत्र फडक्यांनी लिहिलें होतें. तें पत्र (माझ्या टीकेसह) मी तूर्त प्रसिद्ध करीत असून, नारोपंतांच्या कलापूर्ण हस्ताक्षराचा नमुना म्हणून याच पत्राचा छायाचित्रित ठसा वाचकांना परिशिष्ट "ब" मधें पहावयास सांपडेल.

**अत्यंत खाजगी***

श्री ८३६ सदाशिव, पुणें २० मे १९२१

सा. न. वि. वि.

काल दुपारीं व आज सबंध दिवसांत मी कचेरींत आलों नाहीं याचें आपणांस आश्चर्य वाटत असेल. आपलें आश्चर्य दूर करण्यासाठीं हें पत्र लिहावयास मी बसलों खरा, परंतु काय लिहावें तें सुचत नाहीं. परवां सकाळीं मी आपणांस कचेरींत भेटलों तेव्हां देखील मी अतिशय उद्विग्न अशा मनःस्थितींत होतों. पण मीं मोठ्या प्रयत्नानें आपली खरी वृत्ति लपवून ठेवली. कदाचित् त्याच वेळीं माझ्या मनांतील सर्व विचार मीं आपल्यांजवळ बोलून दाखविले असते. परंतु तेव्हा तशी वेळच आली नाहीं. असो.

काहीं दिवसांपूर्वीं सुरत येथील कॉलेजची फिलॉसफीच्या प्रोफेसरशीप-विषयींची जाहिरात वर्तमानपत्रांत आली; व मीं त्या जागेसाठीं अर्ज केला. ज्या अनेक गोष्टींमुळें मला तो अर्ज करणें भाग पडलें, त्या येथें सांगण्यासारख्या नाहींत. माझी इच्छा अर्ज करावा अशी नव्हती. उलट, माझा अर्ज नामंजूर होईल अशी मला खात्री वाटत असल्यामुळें जागा मिळावयाची नाहीं ती नाहींच, परंतु मीं अर्ज केला ही गोष्ट लोकांन, कळल्यावर मजवर अतिशय मोठा लोकापवाद यावयाचा हें मीं जाणून होतों. असें असूनहि मला अर्ज करावा लागला, व माझी भीति खरी ठरली. [ स्वतःची उज्ज्वल देशभक्ति आणि निःस्पृहता पणाला लावून सुरत कॉलेजचे त्या वेळचे प्रिन्सिपाल प्रो. वै. का. राजवाडे यांची पायधरणी करण्यासारखें असें दुसरें कोणतें कारण असेल बरें ! 'जठरपिठरी

दुष्पूरेयं करोति विडंबनम् ' हेंच खरें ! ] माझ्या अर्जाची गोष्ट लोकांना हळूं हळूं माहीत होऊं लागली आहे. कदाचित् आपल्या कानापर्यंतहि ती पोंचली असेल. अशा स्थितींत—म्हणजे ज्या तत्त्वाच्या पुरस्कारासाठीं मी कॉलेज सोडून केसरींत आलों त्या तत्त्वाच्या अगदीं विरुद्ध असें आचरण माझ्या हातून घडलें हें लोकांना कळूं लागलें असतांना—मी केसरी कचेरींत येणें अत्यंत निंद्य होय असें माझ्या मनांत सारखें येतें; व म्हणूनच काल व आज मीं घरीं स्वस्थ विचार करीत पडून राहिलों. गैरहजिरीचा हा असा उलगडा आहे. सध्यां माझें मन अत्यंत अस्वस्थ आहे. काय करावें, व कसें वागावें तें सुचत नाहीं. [ नारोपंतांच्या गैरहजेरीचा हा उलगडा वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावा. ' केसरी ' पक्षाचीं मतें आपल्याला पटत नाहींत किंवा तात्यासाहेब केळकर चळवळीशीं तद्रूप झाले नाहींत अथवा गांधींनीं चळवळिचें पाऊल मागें ओढलें म्हणून कमालीचा मनस्ताप झाल्यामुळें आपण घरीं राहिलों अशा आशयाचा पुसटता उल्लेखहि सबंध पत्रांत कोठें आलेला नाहीं ! ] लोकांच्या अपवादाची भीति मला वास्तविक वाटत नाहीं. कारण लोकांच्या स्तुतीचीहि खरी मींमांसा माझ्या मतें काय आहे तें मीं आपणांस, कधीं सरळपणें तर कधीं विनोद-रूपानें, सांगितलें आहे. अत्यंत दुःख होतें तें येवढ्याचसाठीं कीं, माझी केसरी—मराठ्याची सेवा बंद करण्याचें सामर्थ्य त्या लोकापवादांत असण्याचा बराच संभव आहे. उघडच आहे, या लोकापवादानंतर सार्वजनिक कार्य मला करतां येणें शक्य नाहीं; आणि एका दृष्टीनें लांछित मनुष्य केसरींत असणें, हें संस्थेच्या व व्यक्तीच्या—दोघांच्याहि दृष्टीनें भूषणावह मुळींच नाहीं. अशा स्वरूपाच्या विचारांनीं आज दोन दिवस मनांत गर्दी करून सोडली आहे. तात्यासाहेब केळकर, आपण स्वतः व कचेरींतील इतर मंडळी या सर्वांच्या मनांत मजविषयीं किती क्षुद्र भावना उत्पन्न होतील याचा विचार करूं लागलों कीं डोकें भणाणून जातें. [ आपल्या अप्रा-माणिक वर्तनानें केसरी कचेरींतील जबाबदार मंडळींच्या मनांत क्षुद्र भावना उत्पन्न होतील अशी नारोपंतांची पूर्ण खात्री असूनहि त्या मंडळींनीं या माणसाचा फूटबॉल गायकवाड वाड्यासमोरच्या रस्त्यावर उडवून लावण्याऐवजीं त्याला जें सौजन्य दाखवलें, त्या सौजन्याला 'केसरी

संस्थेच्या नांवानें आतां बोटें मोडणारा हा कृतघ्न इसम मुळींच लायक नव्हता याबद्दल समंजस लोकांची खात्री होईलच. ]

हें पत्र अत्यंत खाजगी आहे. जी गोष्ट मीं आपणास सांगितली आहे, ती तात्यासाहेब केळकर यांना कळविणें आपल्या चतुर बुद्धीवरच सोंपवावेंसें वाटतें. [फडके नांवाचा ग्रामसिंह त्या वेळीं तात्यासाहेब केळकर या नांवाला सुद्धां किती भीत होता त्याचें हें प्रत्यक्ष उदाहरण ! ] ज्या मित्रत्वाच्या नात्यानें मी आपणांस पत्र लिहिलें, त्याच नात्यानें आपल्या-कडून कांहीं पत्र आल्यास सध्यांच्या विषण्ण मनःस्थितीचा क्षणभर विसर पडेल. [ ' मराठ्या ' चा अंक छपाईच्या यंत्रावर चढलेला असतांना परगांवचें व्याख्यान आटपून केवळ नारबा फडक्यांची ' आलबेल ' घेण्या-करितां कचेरींत पाऊल टाकणाऱ्या बाबूराव गोखल्यांच्या अंगावर या संपादक महाशयांच्या 'विषण्ण मनःस्थितीचा क्षणभर विसर ' पाडण्याचीही जबाबदारी होती असें दिसतें.] पुष्कळ लिहिण्यासारखें आहे, पण आतां इतकें लिहिलें यानेंच मनाची पुष्कळ ओढाताण झाली. सबब इतकें पुरे. निरंतर लोभ असावा ही विनंति.

ना. सी. फडके.

ता. क.—हें पत्र केवळ आपल्यासाठीं आहे. तें आपण दुसऱ्या कोणासही दाखवूं नये; व त्यांतील मजकुराचा उपयोगहि सुविचारानें करावा.

स्वःच्या बेगडी देशभक्तीचें थडगें बांधल्यावर त्या थडग्यावर कोर-ण्यासाठीं नारोपंतांनीं स्वतः रचलेली अशी ही विलापिका आहे! खुनाच्या रक्तानें बरबटलेल्या बोटांचे डाग सप्तसमुद्रांच्या पाण्यानें धुऊन काढण्याचा प्रयत्न केला तरी ते डाग तसेच शिल्लक राहात असतात. खुनी माणसानें अत्यंत सावधगिरीनें म्हणून नष्ट केलेल्या पुराव्याचा एखादा सूक्ष्म तंतु खुनी माणसाच्या नकळत मागें शिल्लक रहात असतो; आणि कालांतरानें त्याच तंतूचा तांत तयार होऊन त्याचा फांस त्याच्या गळ्याभोंवतीं नेमका आंवळला जातो.

१९२० सालच्या असहकारितेच्या चळवळींत जे जे लोक सामील झाले होते त्यांपैकीं उभ्या महाराष्ट्रांत आपल्याइतक्या धडाडीनें पुढें पाऊल टाकण्यास कुणीच तयार नव्हतें; लोकमान्य टिळकांच्या तालमींत तयार झालेल्या तात्यासाहेब केळकरांसारख्या 'उस्तादा'नें सुद्धां त्या वेळीं अंगचुकारपणा केला—प्रत्यक्ष गांधींसारख्या म्होरक्यानेंहि ज्या वेळीं कच खाल्ली, त्या वेळीं आपलें एकट्याचें पाऊल सर्वांच्या पुढें होतें असें भासविण्याकरितां या माणसानें ज्या बेसुमार थापा मारल्या आहेत, त्या थापांवर या गृहस्थाच्या स्वदस्तुरच्या पत्रानेंच स्वच्छ प्रकाश पडून खरा प्रकार काय होता हें वाचकांच्या निदर्शनास आणलें आहे. स्वतःच्या हातून घडलेल्या तत्त्वच्युतीच्या पाचारणामुळें पस्तावलेल्या विषण्ण मनःस्थितींत 'केसरी' संचालकांच्या क्षमेची याचना करण्यासाठीं काळवंडलेल्या मुद्रेनें आणि डागाळलेल्या हातानें एकवीस वर्षांपूर्वी लिहिलेलें हें पत्र, "दुसऱ्यांच्या नालस्त्या करून स्वतःची प्रतिष्ठा मिरवूं पाहणारा नारोपंत फडके नांवाचा तोतया आणि स्वार्थसाधु देशभक्त आज ज्या थापा मारीत आहे, त्या थापांवर यत्किंचितहि विश्वास ठेवूं नका" असें उच्च स्वरानें समंजस वाचकांना बजावून सांगण्याकरितां, इतक्या वर्षांच्या दडपणांतून वर डोकें काढून एकाएकीं पुढें येईल, आणि आपण आपल्या भकास चेहऱ्याला साहित्यसेवेंतील स्मृतीच्या सफेतीनें उजळा चढवण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असतां ऐन वेळीं आपल्या चेहऱ्याला अशा रीतीनें काजळी फांसील, अशी या "बातारामा"ला कल्पनाहि नसेल !

"साहित्यसेवेंतील स्मृतीं'चें निमित्त पुढें करून आत्मचरित्राचें कंटाळवाणें पुराण 'झंकार'च्या वाचकांच्या श्रुतिपथावर घालण्याचा अंतःस्थ मनोदय, पूर्ण करतांना 'आत्मचरित्र लिहिणाऱ्या व्यक्तीनं आपल्या जीवितांतल्या खाजगी गोष्टीचं वर्णन करतांना आत्मप्रदर्शन किती करावं, अन् संयम किती राखावा' या नाजुक प्रश्नाचा विचार आत्मचरित्रकारानें अवश्य केला पाहिजे असें स्वतःचें मत नारोपंतांनीं केळकरांच्या 'गत-गोष्टी'वरून सुचलेल्या विचारांत ('धनुर्धारी' १८ फेब्रुवारी १९३९ चा अंक) स्पष्टपणें नमूद केलें आहे. "आपण जें जें केलं तें योग्यच होतं, लोकांनीं प्रसंगाविशेषीं आपली जी निंदा केली ती चुकीची होती, व

आपल्या सर्व कृत्यांची वास्तविक प्रशंसाच व्हायला पाहिजे होती, असा निष्कर्ष काढून आपल्या चारित्र्याला रंगसफेती द्यायसाठीं जो मनुष्य आत्म-चरित्र लिहील तो आल्या ग्रंथाची किंमत कमी करून बसेल. इतिहास वाच-तांना, वाचकाची जी अपेक्षा असते सत्याच कांहीं अपेक्षेनें वाचक आत्मचरित्र वाचीत असतो. त्याला सत्य समजून घ्यायचं असतं " असें बजावून सांगणाऱ्या या पुराणिकबोवांनीं 'साहित्यसेवेंतील स्मृति' सांगतांना हा महत्त्वाचा शास्त्राधार केवळ स्वतःच्या सोयीसाठीं पुराणांत गुंडाळून ठेवल्यासारखा दिसतो !

आपल्या तुरुंगवासांत जगाच्या इतिहासाचें लेखनकार्य करीत असतां डोळ्यादेखत झालेल्या मारामारीची साद्यंत हकीगत आपल्याला सांगतां आली नाहीं या गोष्टीचा विषाद वाटून सर वॉल्टर रॅलेनें आपलें हस्तलिखित जवळच्या शेगडींत टाकून दिलें, अशी एक आख्यायिका आहे. पण रॅले हा प्रामाणिक मनुष्य असल्यामुळें वैतागाच्या भरांत त्यानें ही गोष्ट केली असें जाणून जवळच्या लोकांनीं तें हस्तलिखित अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडूं दिलें नाहीं. नारोपंतांच्या अंगांत रॅलेच्या अंगांत अस-लेल्या प्रामाणिकपणाचा अल्पांशही शिल्लक असता, तर आपण बेगुमानपणें मारलेल्या थापांचें सप्रमाण माप आपल्या पदरांत दुसऱ्यांनीं घातल्याचें आढळून येतांच ' साहित्यसेवेंतील स्मृति ' प्रसिद्ध करण्याकरितां प्रका-शकाकडे धांव ठोकण्याऐवजीं त्या टाकाऊ रद्दीची वासलात लावण्यासाठीं नारोपंतांनीं एकाद्या वाण्याकडेच धूम ठोकली असती. निदान त्यांच्या शिष्यांनीं जरी हें सत्कृत्य पार पाडलें असतें तरी फार बरें झालें असतें. कारण अथांग थापांनीं आणि सत्यापलापांनीं ओतप्रोत भरलेल्या या भिकार पुस्तकानें नवोदित पिढींतील वाचकांची उघड उघड फसवणूक करून आपली ' गुरुमाउली ' जें पाप जोडूं पाहत आहेत, त्या पापापासून या ' सद्गुरू 'ना परावृत्त करण्याचें पुण्य तरी पुरोगामी संप्रदायांतील या टाळकऱ्या–माळकऱ्यांच्या पदरांत पडलें असतें. नारोपंत फडक्यांची ' टिच्चून ' वल्गना करणारी जीभ आजपर्यंत या बाबतींत एकहि शब्द उच्चारूं शकली नाहीं, या एकाच गोष्टीवरून नारोपंतांनीं केलेली थापे-

बाजी बिनतोड पुराव्यानिशीं मीं त्यांच्या पदरांत टाकली आहे याबद्दल वाचकांची खात्री होईल.

वाइटांतून पुष्कळ वेळां कांहीं चांगल्याहि गोष्टी निर्माण होतातच. 'बाताराम' संप्रदायाच्या शृंगेरी पीठाचे शंकराचार्य जे भार्गवस्वामी, त्यांच्या पश्चात् अस्सल थापेबाजीचा संप्रदाय लुप्तप्राय होतो कीं काय अशी कांहीं लोकांना जी भीति वाटत होती, ती मात्र आतां दूर झाली ! कारण भार्गवस्वामींच्या कृपाप्रसादानें थापेबाजीच्या विद्येंत निष्णात झालेले हे नारायणस्वामी करवीरपीठाची गादी संभाळून 'बाताराम' संप्रदायाच्या लौकिकांत भर घालतील इतकेंच नव्हे, तर लोणकढ्या थापांबद्दल कोल्हापुरचा आजपर्यंत जो ऐकीव लौकिक होता, त्या लौकिकांत या 'साहित्यसेवेंतील स्मृति' मौल्यवान् भर टाकतील असें म्हणायला हरकत नाहीं.

---

## परिशिष्ट—अ

# प्रतिभासाधन चौकशी-कमिटीचा रिपोर्ट.

## प्रतिभासाधन-समिति

प्रतिभासाधन-समितीनें नेमलेल्या उपसमितीनें अनेक सभा भराविल्या, मुद्दे काढले, उतारे काढून, ताडून पाहून चर्चा केली, अखेर एक कच्चा अहवालहि तयार करून समितीची सभा भरवून तीपुढें सर्व वृत्त मांडण्यांत आलें. उपसमितींत व समितींत सर्वांचे मतें अखेरचा अहवाल अध्यक्षांनींच लिहावा असें ठरलें. मुद्यांना अनुलक्षून परिशिष्टरूपानें उताऱ्यांचें एक कोष्टक दिलें पाहिजे. हें काम रा. शिखरे, प्रो. जोग, प्रो. वाडेकर व रा. हर्षे यांनींच मुख्यत्वेंकरून केलें आहे. अध्यक्षांनीं सर्वांचें म्हणणें ऐकून कागदपत्र पाहून, स्वतःस साम्यस्थळें आढळलीं त्यांचे अनुरोधानें आपला समालोचनात्मक व निर्णयात्मक अहवाल तयार केला. समितीच्या सर्व सभासदांकडे हा अहवाल पाठविण्यांत येऊन सुमारें आठवड्याभरानें एक शेवटची सभा प्रो. पोतदार यांचे घरीं भरविली. या सभेंत रा. बापुराव आंबेकर, प्रो. वाडेकर, रा. शिखरे, प्रो. केळकर, प्रो. चापेकर वगैरेंच्या सूचनांचा विचार होऊन तदनुसार अहवाल पक्का करून त्यावर बहुतेक सर्व सभासदांच्या सह्या झाल्या. परगांवींच्या सभासदांपैकीं रा. ना. ह. आपटे व रावसा. चापेकर यांनीं अहवाल पाहून लेखी संमति कळविली. रा. वि. सी. गुर्जर यांजकडे प्रुफें पाठविलीं आहेत त्यांच्याकडून जो खुलासा येईल तो मागाहून प्रसिद्ध करूं. तेव्हां एकाशिवाय इतर सर्व सभासदांच्या सह्या ज्या पक्षीं आल्या आहेत त्या पक्षीं आतां अधिक वाट पहाणें योग्य नाहीं असें ठरवून हा पुढें जोडलेला **निर्णयात्मक** अहवाल प्रसिद्ध करण्यांत येत आहे. जिज्ञासूंना एवढीच विनंति आहे कीं, त्यांनीं मूळ प्रतिभासाधन, आर्ट ऑफ फिक्शन व वर्तमानपत्रांतील याविषयीं प्रसिद्ध झालेला पत्रव्यवहार वगैरे सर्व काळजीपूर्वक पाहून आपला स्वतःचा निर्णय ठरवावा. या कामीं समितीच्या निर्णयाचा त्यांस कांहीं उपयोग झाल्याचें कळल्यास समितीस आपले श्रम सफळ झालेसें वाटेल. कळावें, ही विनंति.

ज्येष्ठ व. २।५५ पुणें. दत्तो वामन पोतदार.

## १ प्रकरणाचा इतिहास.

प्रतिभासाधन या नांवाचा एक ग्रंथ प्रो. नारायण सीताराम फडके एम्. ए. यांनीं १९३१।३२ सालीं प्रसिद्ध केला. तदनंतर ता. १४ आक्टोबर १९३२ रोजीं ज्ञानप्रकाश वर्तमानपत्रांत रा. रा. प्र. कानिट-कर एम्. ए. यांनीं एक विस्तृत लेख प्रसिद्ध करून सदर प्रतिभासाधन हा ग्रंथ " अनुवादित " असून " फडके हे केवळ भाषांतरे व परपुष्ट लेखक ठरतात " असें म्हणून " प्रतिभासाधन हा ग्रंथ क्लेटन-हॅमिल्टन नावाच्या एका अमेरिकन ग्रंथकारानें लिहिलेल्या ' Art of Fiction ' या ग्रंथावरून अनुवादित केलेला आहे. " इतकेंच नाहीं तर फडके यांनी " बुध्याच हें...दडपून टाकलें असावें " असें लिहून आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ प्रतिभासाधन व Art of Fiction यांतील साम्य स्थळें आपल्या मताप्रमाणें दाखल केलीं आहेत; आणि अखेर साहित्यभक्तांनीं या ' वाङ्मयशर्विलकगिरीची अथवा वाङ्मयचौर्याची ' " सांगोपांग चर्चा " अवश्य केली पाहिजे असें सुचविलें आहे. तारीख १६–१०–३२ रोजीं रा. फडके यांनीं सदर पत्राला प्रत्युत्तर लिहून सुमारें तीनशें पृष्ठात " बारा वाक्यें व तीन पॅरेग्राफ एवढीच माझी उसनवारी दाखवून सबंध ग्रंथ असलाच उसना आहे असें जगाला सांग-ण्याची हातचलाखी " रा. कानिटकर यांनीं केल्याची तक्रार केली आणि " हॅमिल्टनच्याच काय इतर पन्नाससाठ लेखकांच्या किती तरी पुस्तकांच्या परिशीलनाचा उपयोग मी करून घेतला आहे " असे कळ-वून पुढे अशी प्रतिज्ञा केली आहे कीं " मी पुन्हां आपल्याला व वाचक-वर्गाला ठिचून सांगतों कीं प्रतिभासाधन हें कित्येक वर्षांच्या माझ्या अध्ययनाचें, मननाचें, स्वतंत्र विचारांचें आणि परिश्रमाचें फल आहे." दुसऱ्या एके जागीं " माझ्या प्रतिभासाधन ग्रंथांतल्या व मग माझ्या बाकी सर्व ग्रंथांतल्या चोऱ्या चवाठ्यावर आणाव्या " असेंहि त्यांनीं रा. कानिटकर यांस व इतरांस सुचविलें आहे.

यानंतर वर्तमानपत्रांतून बराच पत्रव्यवहार या प्रकरणीं प्रसिद्ध झाला. त्यांत ता. १०–११–१९३२ रोजीं महाराष्ट्रसाहित्यमंदिराचे चिटणीस

रा. गो. गो. अधिकारी यांनीं ज्ञानप्रकाश वर्तमानपत्रांत या वादाच्या प्रकरणीं निर्णय करण्याकरितां एक विद्वानांची " खासगी स्वरूपाची " सभा बोलावून तिचा निर्णय वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करावा असें सुचवून " प्रतिभासाधन हें पुस्तक रूपांतरित किंवा भाषांतरित ठरलें तरी मराठी भाषेंतील ग्रंथसंपत्तीमधील त्याचा दर्जा कमी होत नाहीं...प्रश्न शिल्लक राहतो तो इतकाच कीं, या बाबतींत लेखकाची योग्यता कोणत्या दर्जाची ठरवावी.........२६० पानांच्या पुस्तकांत एवढे २७ उतारे दाखविले म्हणजे तेवढ्यावरून प्रतिभासाधन या पुस्तकाचें स्वतंत्र कर्तृत्व नाहींसें होतें कीं काय असा फडके यांचा प्रश्न आहे. याचा निर्णय विद्वानांच्या कमिटीनें करावा. " म्हणून त्यांनीं पंधरा विद्वानांचीं नांवें समितीसाठीं सुचविलीं. प्रोफेसर फडके यांचा आग्रह लवाद नेमण्यासंबंधींचा होता आणि खाजगी समितीची कल्पना त्यांस मान्य नव्हती. यावरहि रा. अधिकारी, रा. माटे, प्रो. पोतदार, रा. प्र. के. अत्रे, रा. दा. न. शिखरे, रा. कृ. पां. कुलकर्णी, रा. य. रा. दाते व रा.बा.मा. आंबेकर प्रभृति निमंत्रित विद्वान् वगैरेंचीं पत्रें प्रसिद्ध होऊन अखेर ता. १९–११ १९३२ रोजीं निमंत्रित विद्वानांची सभा भारत–इतिहास–संशोधकमंडळ–मंदिरांत दुपारीं ४ वाजतां भरली. त्या सभेला प्रो. फडके, रा. कानिटकर व रा. भा. म. कुलकर्णी हेहि हजर होते. या सभेचा वृत्तान्त अधिकृत रीत्या समितीचे अध्यक्ष यांनीं ता. २६–११–१९३२ च्या ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध केलाच आहे. या सभेंत रा. फडके यांनीं जें भाषण केलें तें थोडेसें सुधारून व वाढवून ता. २८–११–१९३२ रोजीं ज्ञानप्रकाशांत प्रसिद्धी-साठीं पाठविलें व तेथें तें प्रसिद्ध झालेंहि. विद्वत्समितीनें नेमलेली उप-समिति हिची सभा ता. २७-११-३२ रोजीं प्रो. पोतदार यांचे अध्यक्षते-खालीं होऊन समितीनें कोणकोणत्या प्रश्नांचा विचार करावा त्या मुद्यांचें सविस्तर टिपण तयार करण्यांत आलें; तेंहि ता. २७ रोजीं चिटणीस रा. अधिकारी यांनीं ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध केलें आहे.

यानंतर या उपसमितीच्या पुष्कळ सभा सवडीप्रमाणें भरल्या. सर्व सभासद सर्व सभांना नेहमींच हजर राहूं शकले असें झालें नाहीं. तथापि वेळोवेळीं निरनिराळ्या सभासदांनीं आपआपल्या अभ्यासानुसार निस-

निराळे मुद्दे व प्रमाणें उपसमितीपुढें मांडून प्रतिभासाधन व Art of Fiction यांतील संबंधाचाच मुख्यतः खल केला. इतर प्रश्न तितकेसे विचारांत घेण्याचें कारण नाहीं असें धोरण पुढें ठरविलें. मध्यंतरीं ज्ञानप्रकाशांत क्लेटन-हॅमिल्टन यांच्या Art of Fiction ची प्रो. फडके यांची खासगी प्रत त्यांनीं कबूल केल्याप्रमाणें समितीस दिली किंवा नाहीं याविषयीं रा. अधिकारी व फडके यांचीं कांहीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. यासंबंधांत खरा प्रकार काय आहे तो सर्वांस कळावा म्हणून प्रो. फडके व समितीचे अध्यक्ष प्रो. पोतदार यांचेमधील पत्रव्यवहार अलाहिदा प्रसिद्ध केला होता त्यावरून प्रो. फडके यांनीं पूर्वी कबूल केल्याप्रमाणें समितीच्या उपयोगासाठीं आपले जवळील स्वतःची खाजगी प्रत समितीच्या उपयोगार्थ म्हणून दिली नाहीं असें निःसंशय स्थापित होतें. असें असतां ती तशी दिल्याबद्दल गैरसमज होण्याजोगा मजकूर त्यांनीं स्वतः होऊन प्रसिद्ध केला आणि दुराग्रहपूर्वक त्याचें समर्थन केलें ही गोष्ट त्यांस निःसंशय कमीपणा आणणारी झाली आणि याबद्दल समितीस अत्यंत खेद होतो हें येथें नमूद करणें समितीचें कर्तव्य आहे.

क्लेटन-हॅमिल्टनचें Art of Fiction हें पुस्तक येथें कोठें न मिळाल्यामुळें त्याच्या प्रती थेट अमेरिकेहून मागवाव्या लागल्या आणि त्या हातीं येईपावेतों समितींतील सभासदांना कांहींहि कार्य करितां आलें नाहीं, आणि यामुळेंच अपेक्षित वेळेच्या आंत समितीला आपला निर्णय प्रसिद्ध करणें शक्य झालें नाहीं. प्रती हातीं आल्यानंतर दुसऱ्या कांहीं अडचणी निघून अधिकच वेळ लागला आणि त्यामुळें अपेक्षेपेक्षां कित्येक महिने उशीरा आपला निर्णय प्रसिद्ध करावा लागत आहे याबद्दल समितीला खरोखर दिलगिरी वाटते. पण यास समितीचा नाइलाज होता एवढें जनतेस कळविणें अवश्य आहे.

## २ आक्षेपकांचे मुद्दे व समितीचे मुद्दे

आतां आक्षेपकांचे मुख्य मुख्य मुद्दे काय आहेत ते आपण पाहूं. पैकीं रा. कानिटकर—म्हणजेच रा. भा. म. कुलकर्णी—यांचे आक्षेप मागील इतिहासाच्या कलमांत थोडक्यांत त्यांच्याच शब्दांत दिले आहेत. आक्षेपकांचा मुख्य रोख प्रतिभा-साधन ग्रंथावरच आहे आणि प्रत्युत्तराच्या

उसळींत प्रो. फडके यांनीं प्रतिभा-साधनच काय पण " माझ्या बाकीच्या सर्व ग्रंथांतील चोऱ्या चव्हाट्यावर आणाव्यात " असेंहि आव्हानपुरस्सर लिहिलें आणि तोच धक्का आमच्या समितीपर्यंत पोंचून प्राथमिक मुद्दे ठरवितांना " फडके यांनीं लिहिलेल्या इतर पुस्तकांत दुसऱ्यांचें ऋण किती यावरून या प्रतिभासाधनाच्या चर्चेवर पडणारा अप्रत्यक्ष प्रकाश " असा पांचवा मुद्दा समितीनें काढला होता. तथापि प्रतिभासाधन व Art of Fiction यांचा अन्योन्यसंबंध निश्चितपणानें बारकाईनें शोधून पाहतां अखेरचा निर्णय व्यक्त करण्यासाठीं वर पांचवा मुद्दा म्हणून जो नमूद केला आहे त्याची आवश्यकता विशेष उरत नाहीं असें समितीस वाटून तो मुद्दा समितीनें बाजूस ठेवला. या मुद्याचा उपयोग मुद्याच्या भाषेंत नमूद केल्याप्रमाणें अप्रत्यक्ष स्वरूपाचा अर्थात् दुय्यम स्वरूपाचाच होण्याजोगा होता हें लक्षांत येईलच. " एक ' अल्ला हो अकबर ' ही कादंबरी सोडून युगांतर नाटकाबद्दल व आपल्या प्रत्येक कादंबरीविषयीं कोणासहि स्वीकारतां येईल अशा प्रकारचें आव्हान " रा. फडके यांनीं देऊन ठेविलें आहे. तें अभुक्तच ठेवणें समितीस वर लिहिल्याप्रमाणें अवश्य वाटलें. एकावरून दुसरीकडे असें बोलणें थोडें भरकटत चाललें म्हणजे ज्याप्रमाणें घसंगळल्यासारखें होतें तसाच कांहींसा प्रकार वर्तमान-पत्रांतील पत्रापत्रींत व्हावा हें साहजिक आहे. Sex Problem in India ' आजचे तरुण स्त्री–पुरुष व त्यांजपुढील प्रश्न ' डी व्हॅलेरा वगैरे रा. फडके यांचे ग्रंथ यांबद्दलहि स्वतंत्र कर्तृत्वाचें आव्हान कां देण्यांत आलें नाहीं अशाहि उलट प्रश्नाचा पेंच रा. फडके यांजवर टाकण्यांत आला. इतकेंच नव्हे तर प्रतिभासाधन हा ग्रंथ आपल्या परिशीलनाचें फल आहे असें म्हणतांना परिशीलन या शब्दाचा अर्थ अर्थात् भाषांतर असा स्पष्ट दिसतो असें म्हणण्यासहि रा. कानिटकर यांनीं कमी केलें नाहीं. प्रतिभासाधन हा ग्रंथ लिहितांना " हॅमिल्टनच्याच काय पण इतर ५०।६० लेखकांच्या लहानमोठ्या किती तरी पुस्तकांच्या परिशीलनाचा उपयोग मी करून घेतलेला आहे" असें रा. फडके यांचें म्हणणें आहे. या बाबतींत उपयोग करून घेतलेल्या पुस्तकांची म्हणजे आधारभूत पुस्तकांची यादी रा. फडके यांनीं ग्रंथास जोडावयास हवी होती किंवा आतां तरी

निदान प्रसिद्ध करावी म्हणून यादींचा अभाव हा एक दोष रा. फडके यांजवर स्थापण्यांत आला आहे. यादी " ग्रंथांत न देण्याचें कारण इतकेंच कीं एक तर एवढी मोठी यादी देणें म्हणजे कोठल्याहि चांगल्या लायब्ररीच्या कॅटलॉगांत अशा सदराखालीं सांपडण्यासारख्या ग्रंथांची यादी देण्यासारखेंच आहे " आणि शिवाय त्या शेपन्नास पुस्तकांच्या यादीवरून फडक्यांनीं साऱ्या पुस्तकांचा सारांश आम्हांस सादर केला आहे असा समज झाला असता तो कां होऊं द्यावा ? " असें रा. फडके यांचें या प्रकरणीं समर्थन आहे. अशा रीतीनें यादींचा अभाव पुष्कळच टीकाकारांस व आक्षेपकांस जाणवल्याचें उघडच दिसतें. रा. शं. ब. चव्हाण यांनीं यावरून ' चोरीचा नसला तरी कृतघ्नपणाचा आरोप रा. फडके यांजवर येतो " असें ज्ञानप्रकाशांत म्हटले आहे. रा. लीकूरकर यांनीं सुचाविलेल्या मुद्यांत 'कायदा आणि शिष्टाचार यांचे अन्वयें प्रतिभासाधन ग्रंथांच्या लेखकाच्या अधिकारक्षेत्राची मर्यादा काय असू शकेल ' असा मुद्दा आला आहे. त्यांत कायद्याच्या दृष्टीनें या प्रश्नाची चर्चा करण्याचा भाग नवीन आहे. कॉपी राईटच्या संबंधांत झालेल्या वेगवेगळ्या खटल्यांत असलेल्या तद्विषयक सामग्रीचा उपयोग स्वतंत्र ग्रंथकर्तृत्वाची व्याख्या वगैरे ठरवितांना होईल म्हणून या प्रकरणीं कांहीं विचार व मुद्दे प्रो. केळकर यांनीं उपसमितीपुढें मांडले होते. तथापि समितीनें करावयाचा विचार " मुख्यतः नैतिक दृष्टीनेंच करावयाचा आहे " असें ठरल्यामुळें कॉपी राइटच्या मुद्यांसंबंधींचा विचार गौण म्हणून मागें ठेवण्यांत आला. भोजराज प्राईझच्या बाबतींत प्रो. जोशी यांनीं प्रो. पोतदार यांचें मत उद्धृत करून ज्ञानप्रकाशांत ता. ११–११–३२ रोजीं आपलें म्हणणें मांडलें होतें. परंतु हा प्रश्न भोजराज कमिटीचा आहे, आपला नाहीं असें ठरवून त्याचा उप–समितीनें पुढें विचार केला नाहीं. आपलें काम सुरू केलें त्यावेळीं वर्तमानपत्रांत जाहीर रीतीनें प्रसिद्ध झालेले आणि समितींतील सभासदांनीं समितीस सादर केलेले अनेक मुद्दे पाहून पुढील सहाच मुद्दे विचारांत घ्यावेत असें उपसमितीनें ठरविलें.

१ प्रतिभासाधनांतील उतारे.

( अ ) मान्य केलेले दुसऱ्यांचे उतारे किती ?

( आ ) मान्य न केलेले दुसऱ्यांचे उतारे किती ?

( इ ) क्लेटन हॅमिल्टनकृत पुस्तकांतील उतारे किती ?

( ई ) इतर ग्रंथांतील उतारे किती ?

( उ ) रीतसर दाखविलेले उतारे किती व न दाखविलेले किती ?

२ भाषांतरित भाग किती ?

३ सारभूत भाषांतरित भाग किती ?

४ शोधावयास कठिण जाईल अशा रितीनें घेतलेला दुसऱ्या पुस्तकांतील मजकूर किती ?

५ प्रो. फडके यांनीं लिहिलेल्या इतर पुस्तकांतील भाग किती ? व यावरून या प्रतिभासाधनाच्या चर्चेवर पडणारा अप्रत्यक्ष प्रकाश.

६ वर्तमानपत्रांतील वादाविवादांतून उत्पन्न झालेले इतर मुद्दे.

पुढें क्लेटन हॅमिल्टन व प्रतिभा-साधन यांच्या अन्योन्य संबंधाविषयीं निघालेल्या मुद्यांच्या चौकशींत बराच काळ गेल्यावर वरील सहांपैकीं इतर मुद्यांच्या चौकशींत शिरण्याचें विशेष प्रयोजन उरलें नाहीं असें समितीचें मत पडून समितीनें मुख्यतः क्लेटन हॅमिल्टनचें Art of Fiction व प्रतिभासाधन यांचा अन्योन्य संबंध हाच मुद्दा विचारार्थ घेतला. याचा विचार करीत असतां स्वतंत्र ग्रंथकर्तृत्व म्हणजे काय या प्रश्नाचा खल करून त्याबद्दलहि कांहीं निर्णय समितीनें ठरविले आणि त्यांस अनुसरून आपला पुढील निर्णय समितीनें कायम केला.

## ३ प्रो. फडके यांचें समर्थन.

सदरील निर्णय आणि तदनुषंगिक बाबींबद्दल लिहिण्यापूर्वी प्रो. फडके यांनीं आक्षेपकांना म्हणून जीं उत्तरें लेखी व तोंडी प्रसिद्ध केलीं त्यांचें थोडक्यांत संकलन करणें या ठिकाणीं अवश्य आहे.

प्रतिभासाधन हें पुस्तक प्रायः अनुवादात्मक अथवा भाषांतरात्मक आहे या व्यापक आक्षेपाचें समर्थन विशेष कोणी केलें नाहीं,त्यामुळें तो आक्षेप बहुतेक आक्षेपकांसहि अतिव्याप्तीचा वाटला आणि क्लेटन हॅमिल्टनचें Art of Fiction आणि प्रतिभासाधन यांचा अन्योन्यसंबंध एवढाच प्रश्न मुख्यतः विचारासाठीं उरला असें लिहून त्या बाबतींत रा. फडके यांनीं पुढील-

प्रमाणें युक्तिवाद केला आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, "हॅमिल्टन-मध्यें आहे तें इंग्लिश वाङ्मयांतील टीकात्मक ग्रंथांत सगळीकडे आहे; तें Commonplace झालेलें आहे; त्याचा उपयोग वाङ्मयाची टीका लिहितांना कोणीहि करावा आणि तसें करतांना कोणाचें ऋण मानण्याचा बोजा त्याचेवर पडत नाहीं; तसा बोजा त्याचेवर आहे असें ज्याला वाटतें त्याला त्याचे स्वतःचें वाचन अत्यंत आंकुचित असल्यामुळें व कांहीं व्याख्या व सिद्धांत कोठल्या तरी एकाच पुस्तकांत वाचल्याचा नवाशिकेपणा त्याच्या अंगीं असल्यामुळें वाटतें." ह्या म्हणण्याचें समर्थन निरनिराळ्या इंग्रजी टीकाग्रंथांतील उतारे आणि क्रेटन हॅमिल्टन व प्रतिभासाधन यांच्यांतील साम्यदर्शक म्हणून आक्षेपकांनीं पुढें केलेलीं स्थळें यांची आपल्या मतानुरूप मांडणी करून रा. फडके यांनीं आपलें म्हणणें सजविलें आहे. रा. फडके यांचे दुसरें म्हणणें असें आहे, कीं, "ज्याचा व्यासंग सतत मोठा असतो त्याच्या वाचनांत अनेक सुंदर उपमा, उत्प्रेक्षा, अलंकार आलेले असतात. ते मूळ कोठें वाचले हें त्या व्यासंगी मनुष्यास प्रायः आठवत नसतें. परंतु ते त्याला अत्यंत आवडलेले असल्यामुळें त्याचे मनांत खोल रुजलेले असतात, त्याचा उपयोग केल्यानें लेखकाकडे कमीपणा आला असें मानणें वेडेपणाचें आहे." क्रेटनहॅमिल्टन व प्रतिभासाधन यांत जेथें जेथें साम्यसंबंध कोणास आढळतो तेथें तेथें प्रतिभासाधनांतील प्रतिपादनासारखें प्रतिपादन किंवा कल्पनांसारख्या कल्पना क्रेटन हॅमिल्टनमध्येंहि आहेत असें फार तर म्हणतां येईल. याहून अधिक कांहीं नाहीं. रा. फडके यांचा दुसरा मुद्दा असा आहे कीं, "साम्य स्थलाबद्दल...माझ्या व हॅमिल्टनच्या पुस्तकांतील उतारा (आक्षेपकांनीं) मुद्दाम पुढचा मागचा संबंध गाळून विकृत करून दिला आहे." "Complication, Major Knot व Explication या शब्दांसाठीं गुंतागुंत, निरगांठ व उकल हे शब्द वापरल्याबद्दल रा. फडके यांचें असें म्हणणें आहे कीं, "इंग्रजींतील Situation, Climax व Ending यांचीं रूढ भाषांतरें मला क्लिष्ट वाटलीं म्हणून गुंतागुंत वगैरे तीन मराठी शब्द मीं योजले. ते योजण्यांत आणि मी प्रथम शोधून काढले म्हणण्यांत महदंतर आहे. त्या शब्दाचें महत्त्व माझ्या

विवेचनास मी स्वतंत्र कल्पकतेनें चढविलेल्या अनेक अलंकारांच्या भरीला घातलेला एक अलंकार या पलीकडे कांहीं नाहीं. ''

आपल्या ग्रंथाचें स्थान निश्चित समजण्यासाठीं रा. फडके यांचें म्हणणें येणेंप्रमाणें आहे. " माझा प्रतिभासाधन हा ग्रंथ लो. मा. टिळकांचें गीतारहस्य, वामनराव जोश्यांचा नीतिशास्त्र–प्रवेश, नुकतेंच प्रसिद्ध झालेलें श्री. केळकर यांचें राज्यशास्त्र अशा ग्रंथांच्या स्वरूपाचा आहे हें उघड आहे. '' रा. केळकर व रा. वामनराव जोशी यांनीं राज्यशास्त्र-विषयक व नीतिशास्त्राविषयक ' नवे कोरे करकरीत सिद्धान्त वरील ग्रंथांत शोधून ' काढून मांडले नाहींत तर " रूढ, मान्य आणि अनेक ग्रंथ-कारांनीं सांगितलेल्याच व्याख्या वापरल्या आणि सिद्धान्त विशद केले त्या अर्थीं त्यांच्या पुस्तकांस स्वतंत्र कृती ही संज्ञा देण्याचें नाकारलें पाहिजे असा युक्तिवाद कोणी केला तर त्याची शोभा शहाण्या लोकां-कडून परस्परच होईल...या अर्थानें माझा प्रतिभासाधन ग्रंथ हा स्वतंत्रच म्हटला पाहिजे. ''

"१९१५ सालीं मी माझी पहिली कादंबरी लिहिली तेंव्हांपासून सतत १६।१७ वर्षें माझा ललितलेखनाचा व्यासंग अव्याहत चालू आहे. ललितलेखनाच्या प्रकारांतील शास्त्र व तंत्र याविषयीं माझे मनांत सारखे विचार चालू असले पाहिजेत....याखेरीज ठिकठिकाणीं व्याख्यानद्वारा ललितलेखनाच्या शास्त्रतंत्राविषयीं मी आपली विचारसरणी लोकांच्यापुढें मांडीत होतोंच. मला हॅमिल्टनच्याच काय, कसल्या व कोठल्याहि पर-देशी पंडिताची उसनवारी करण्याचें प्रयोजन उरलें नव्हतें. '' इंग्रजी ग्रंथकारांचे विचार पुढें वाचतांना " स्वतः स्वतंत्र विचारानें मनाशीं निश्चित केलेल्या शास्त्रीय तंत्रविषयक सिद्धान्ताचा, व्याख्यानांचा, प्रमे-यांचा व सूत्रांचा पडताळा '' मला मिळाला यांत कांहीं शंका नाहीं तात्पर्य—

( १ ) " माझ्यावर ठरीव शिष्टसंप्रदाय मोडल्याचा आक्षेपसुद्धां लागू होत नाहीं.

( २ ) ऋण गुपित ठेवण्याच्या हेतूचा देखील आरोप माझ्यावर लागू व्हावयाचा नाहीं.

( ३ ) ग्रंथावली देण्याचा ठरलेला शिरस्ता नाहीं. यामुळें मी आपल्या पुस्तकाच्या अखेरीस ती दिली नाहीं. यांत कोणताहि प्रमाद माझेकडून झाला असें म्हणतां यावयाचें नाहीं. असली यादी देणें मला स्वतःला वेडेपणाचें वाटतें. कारण कोणत्याहि विषयावरच्या उपलब्ध ग्रंथांची यादी कोठल्याहि वाचनालयाच्या कॅटलॉगांत मिळण्यासारखी असते. ''

आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ रा. फडके यांनीं ' ललितवाङ्मयविषयक कांहीं वाचनीय ग्रंथांची यादी ' म्हणून ५४ इंग्रजी ग्रंथांचीं नांवें प्रसिद्ध केलीं आहेत. समितीला ज्या आधारभूत ग्रंथांची यादी पुरविण्याचें त्यांनीं मान्य केलें होतें ती ही नव्हे, नुसत्या वाचनीय ग्रंथांची यादी समितीस निरुपयोगी होती.

वरील म्हणणें बहुतेक रा. फडके यांच्या लेखांवरून दिलें आहे. परंतु त्यांनीं केलेल्या भाषणांतील कांहीं विधानें या ठिकाणीं पुरवणीदाखल उतरून घेतल्यास उपयोगीं पडतील असें वाटतें. हीं विधानें सभेच्या अधिकृत वृत्तांतून घेतलीं आहेत.

( १ ) " वाङ्मयाचे सामान्य सिद्धांत व व्याख्या हीं कोणाचीच मालमत्ता होऊं शकत नाहीं. सामान्य सिद्धान्त सर्वच घेतात. माझ्या व्याख्या दुसऱ्या कोणी घेतल्या तरी चालतील. समानार्थक वाक्यें अनेक इंग्रजी ग्रंथकारांत सांपडतात. तेथें तीं अमक्याचींच म्हणून कबूल केलेलीं नाहींत. ''

( २ ) " वास्तविक क्लेटनहॅमिल्टनचें पुस्तक अगदीं टिप्पणवजा आहे. तें विद्यार्थ्यांकरितां आहे. मला तर तें सर्वांत Unsatisfactory वाटलें. अर्थात् मोठालीं पुस्तकें टाकून क्लेटन हॅमिल्टनला नसतेंच महत्त्व देण्याचें मला कारण नव्हतें. ''

( ३ ) " मीं ठिकठिकाणीं authorities दिल्या आहेत. पण Art of Fiction चें मला महत्त्व वाटलें नाहीं. ''

( ४ ) " Moral obligation याचा अर्थ तरी काय असें मी खुद्द हॅमिल्टन यासच विचारलें आहे. मीं पाश्चात्य शिष्टसांप्रदायाचा दंडक तर मोडला नाहींच पण महाराष्ट्रीय शिष्टसांप्रदायाचा दंडकहि मीं मोडला नाहीं. ''

( ५ ) " सभा निर्णायक आहे असें मीहि आपणाप्रमाणें समजत नाहीं......आपली ही सभा मी न्यायसभा मानावयास तयार आहें. प्रथम माझी वृत्ति या सभेबाबत संशयित होती. पुढें तो संशय दूर झाला. आपण शिष्टांनीं सभा केली हें उत्तम केलें. "

## ४ समितीचे निर्णय.

येथवर वादाचा इतिहास, आक्षेपकांचे मुद्दे आणि प्रो. फडके यांचें समर्थन संकलित रूपानें देऊन झालें. यापुढें उपसमितीनें सर्व प्रश्नांची छाननी करून जे निर्णय ठरविले ते दाखल करण्याचें काम उरलें आहे. Art of Fiction व प्रतिभासाधन यांचेमधील संबंधाबत मुद्दा निर्णयास घेण्यापूर्वी **स्वतंत्र ग्रंथकर्तृत्वाची व्याख्या** काय हें लक्षांत घेणें जरूर आहे. नाहीं तर आक्षेपकांची कल्पना एक आणि समर्थकांची दुसरीच असे होऊन केवळ एकच शब्द भिन्न अर्थानें वापरल्यामुळें निर्माण होणारा वितंडवाद आपल्यापुढें येईल. जगाच्या ज्ञानांत प्रत्यक्ष ज्या योगानें कांहीं तरी भर पडते असें ज्ञानसंवर्धक लिखाण केव्हांहि स्वतंत्र गणलें जाईल. अर्थात् संशोधनात्मक यच्चयावत् लिहिणें या सदराखालीं येईल. अशा सर्व लिहिण्याचें महत्त्व नेहमींच सारखें असेल असें नाहीं. एकाद्या क्षुल्लक झुडुपाच्या शोधापासून तों आईनस्टाइनच्या सापेक्षता सिद्धान्तापर्यंत सर्व शोधांचें निरूपण करणारें वाङ्मय हें केव्हांही स्वतंत्रच गणलें जाईल; पण हेंहि त्यांचें स्वातंत्र्य केवळ जन्मकाळापुरतेंच आणि मूळ उत्पादकापुरतेंच मर्यादित समजावें लागेल. अनुवादक आणि प्रसारक यांना उत्पादकांचें महत्त्व कधींहि देतां येणार नाहीं. जसा स्वतंत्र ग्रंथांचा हा वर्ग अगदीं निर्विवाद असा आहे तसाच शुद्ध भाषांतरित ग्रंथ—राजरोस भाषांतरित असें नांव घेऊन वावरणारे ग्रंथ—यांचा वर्ग निर्विवाद आहे आणि त्याचें पारतंत्र्य हेंहि तितकेंच निर्मळ आणि संशयातीत असतें हें सांगावयास नकोच. अगदीं स्वतंत्र किंवा स्वयंभू, आणि भाषांतरित अथवा रूपांतरित किंवा अनुवादित म्हणजे उघड उघड परतंत्र, अशा या दोन टोकांच्या दोन कटी सोडून दिल्या म्हणजे दरम्यानच्या वर्गातील ग्रंथ हे कितपत स्वतंत्र किंवा परतंत्र गणतां येतील हें ठरविणें बरेंच विचाराचें काम आहे. प्रगट झालेल्या ग्रंथांत विचार किंवा ज्ञान अथवा कल्पना हा एक भाग आणि

त्या कल्पनांची केलेली जुळणी अथवा मांडणी हा दुसरा भाग असून त्याच्या आविष्कारासाठीं योजलेली भाषा ही त्याचा तिसरा भाग असतो. म्हणजे विचार, रचना व भाषा अशा त्रिविध दृष्टीनें ग्रंथाचें स्वातंत्र्य किंवा पारतंत्र्य पारखावें लागेल. या तिहींत अर्थात् विचार हें सर्वांत प्रधान अंग होय. तें जितकें नवें व स्वतंत्र असेल तितका ग्रंथ स्वतंत्र ठरेल. मग कदाचित् मांडणीचा सांगाडा किंवा त्या विचारांच्या प्रगटीकरणाकरितां योजलेली भाषा ही दुसऱ्या कोणापासून उचलली असली तरी चिंता नाहीं. विचारांची अभिनवता आणि स्वातंत्र्य हें जेथें स्पष्ट असेल तेथें भाषा आणि रचना स्वतंत्र नसतांनाहि ग्रंथाची गणना स्वतंत्र वर्गांतच करावी लागेल. परंतु विचार बहुतांशीं जुने अथवा दुसऱ्यांचे आणि मांडणी किंवा भाषा यांपैकीं एक किंवा दोन्ही हीं मात्र कर्त्याचीं असा प्रकार असेल तर तेथें त्या कृतीची गणना एकाएकीं स्वतंत्र वर्गांत करतां येणार नाहीं. भाषा आणि मांडणी यांमध्यें विशेष अपूर्वाई असेल तरच अशा ग्रंथास स्वत्रंत वर्गांत स्थान देण्याचा मोह उत्पन्न होईल.

असें नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे कीं या विस्तीर्ण जगांत अगदीं नवें, अगदीं स्वतंत्र आणि अगदीं स्वयंभू असें काय आहे ? विचारांची वंशकुळी शोधीतच गेलें तर कदाचित् आपणाला जगदुत्पत्तीपर्यंतहि मागें जावें लागेल. विचार जुनाच पण पोशाख नवा—नुसता नवा—नुसता नवा नव्हे तर अत्यंत प्रलोभनीय—अशी परिस्थिति असेल त्या वेळेस असे second-hand किंवा उसने विचार नव्यासारखेच व्यवहारांत मोडले जातात. आपण रोज नव्या नव्या कादंबऱ्या अगर गोष्टी शेंकडों प्रसिद्ध झालेल्या ऐकतों, पण खरोखरीच त्यांत अगदीं नवें असें काय असतें ? एकानें तर असें म्हटलें आहे कीं—'It is commonly asserted that there are only seven stories in the world, all the rest being the variations. Possibly seven is an over-estimate' (Marriot:-Art and Craft of writing, page 47 ). असें आहे तरी याच ग्रंथकारानें वरील विधानांतील भ्रम येणेंप्रमाणें दूर केला आहे. " A writer may not be able to originate an absolutely new story

but his particular treatment of it may be an entirely new experiment." (Ibid.)

'तीं तीं पदें नित्य फिरोनि येतीं त्या त्याच अर्थाप्रति दाविताती,
कौशल्य मोठें रचनेंत आहे सत्काव्य तेणें नव वाटताहे—
हें वचन प्रसिद्धच आहे.

अभिनवतेचा हा नवा प्रकार लक्षात घेतला तर **स्वतंत्रप्राय** असा साहित्यकृतींचा एक वर्ग कल्पावा लागेल आणि मांडणी किंवा भाषा अथवा दोन्हीहि ज्यांमध्यें अपूर्व नवलाईच्या आहेत तशी कृति या वर्गांत घालावी लागेल आणि अगदीं स्वतंत्र असें नामाभिधान जरी या कृतीला देतां आलें नाहीं तरी वर वर्णन केल्याप्रमाणें स्वतंत्रप्राय असें नामाभिधान तीस देण्यांत कसलीहि भीति नाहीं.

येथें आणखी एका बाबीचा उलगडा आगाऊच करून ठेवूं. पूर्वसूरींनीं जें जें कांहीं म्हटलें किंवा लिहून ठेवलें असेल तें तें सर्व त्याच्या मागच्यांनीं वडिलोपार्जित मिळकत म्हणून खुशाल बिनधोक आपलेंच म्हणून हक्कानें वापरावें, त्यांत कसल्याहि प्रकारचा संकोच करूं नये असेंहि कांहीं लोकांचें म्हणणें आहे. उलटपक्षीं, पूर्वजांचें असलें तरी तेंहि कृतज्ञतापूर्वक, त्यांच्या नांवानें, त्यांचें ऋण स्मरून, आपण उपयोगांत घ्यावें हाच खरा शिष्टाचार होय किंबहुना असें पूर्वजांचें स्मरण करणें हें आपलें कर्तव्य आहे असें दुसऱ्या कित्येकांचें म्हणणें आहे. पूर्वजांच्या ज्ञानभांडारापैकीं कित्येक नाणीं अगदीं सर्रहा प्रचारांत असतात. वापरून वापरून तीं इतकीं झिजून गेलेलीं असतात कीं त्यांवरील कर्तृत्वाचा वैय्यक्तिक ठसा पार घासून गेलेला असतो. अशीं घासलेलीं परंतु माहितगारांच्या परिचयांतलीं नाणीं भिन्न नांवानें वापरलीं गेलीं तर त्यांत कांहीं दोष उत्पन्न होतो असें आम्हांस वाटत नाहीं. परंतु जेथें ठसा घासून गेला नसेल तेथें तो आपण मुद्दाम घासून टाकणें हें कांहीं शिष्ट कृत्य ठरणार नाहीं. शिष्टमान्य दंडक, पूर्वेकडे काय किंवा पश्चिमेकडे काय, ज्याचें त्यास द्यावें, परस्वाचा अपहार करूं नये असाच आहे. अपहार याप्रमाणें जरी बाधित आहे तरी उपभोग मात्र बाधित नाहीं. ज्याची वस्तु त्याची म्हणून आपल्या उपयोगाकरितां तसें सांगून वापरणें

यांत कांहींच गैर नाहीं. एवढे मोठे भगवान् श्रीकृष्ण; पण त्यांनीं सुद्धां आपल्या भगवद्गीतेंत ‘ विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ’ अशा प्रकारें आपण सांगितलेलें दिव्य ज्ञान आपल्या पदरचें नसून पूर्वी विवस्वानानें जें ज्ञान मनूला सांगितलें आणि मनूनें जें इक्ष्वाकूला सांगितलें तेंच आपण ‘ अर्जुना, तुला सांगत आहों ’ सबब तूं तें प्रमाण मानण्यास कांहीं चिंता नाहीं असें म्हटलें आहे. म्हणजे ज्याला जुन्याची अथवा परंपरेची बळकटी आहे तें अधिक ग्राह्य; नवें आणि स्वतंत्र तेवढेंच ग्राह्य असें नाहीं. अशा प्रकारचा सिद्धान्त या आपल्या कृतीनें श्रीकृष्णांनीं जगास शिकविला आहे आणि हीच शिष्टमान्य अशी नीति आहे. वारसाला बापाचें नांव सांगण्यास लाज वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. किंबहुना तसें सांगण्याची तो टाळाटाळ करील तर त्याच्या जन्मशुद्धीविषयीं संशय घेणें गैर ठरणार नाहीं. असो. याहून अधिक प्रपंच येथें आवश्यक दिसत नाहीं.

मराठी वाङ्मयासंबंधानें बोलतांना आणखी एक मर्यादा ध्यानांत ठेवली पाहिजे. आपलें मराठी वाङ्मय हें कांहीं बाबतींत गरजू वाङ्मय आहे म्हटलें तरी चालेल. विशेषेंकरून पाश्चात्य लोकांची विचारसंपत्ति आणि कलासक्ति यांची ओळख मराठी वाङ्मयाच्या द्वारें जितकी जितकी आपल्या लोकांस होईल तितकी तितकी आपली एक मोठी गरज पुरविल्याप्रमाणें होईल. अशा दृष्टीनें केलेले प्रयत्न हेहि एक प्रकारें विचारांचा नवीनपणा नसतांनाहि आपल्या मराठी वाङ्मयापुरते स्वतंत्र पदवीला प्राप्त होऊं शकतात. ‘ मराठींत तेवढीच भर पडली ’ असें म्हणून यामुळें समाधानाचे उद्गार आपण सहजच बाहेर टाकतों. आणि ज्यांना पाश्चिमात्य विचारांची ओळखहि नाहीं अशा लोकांना असे पाश्चात्य ज्ञान सांठविलेले ग्रंथ नवीन, स्वतंत्र आणि प्रसंगीं स्फूर्तिदायक वाटतात. हें प्रथमच सांगावयास कांहीं हरकत नाहीं कीं, रा. फडके यांचा प्रतिभासाधन हा ग्रंथ जगाच्या ज्ञानांत कोणत्याही प्रकारची भर घालण्याकरितां लिहिलेला नाहीं. अर्थात् विचारदृष्ट्या पाहतां या ग्रंथास स्वतंत्र असें म्हणतां यावयाचें नाहीं. पाश्चिमात्य लोकांनीं साहित्यशास्त्रविषयक जे विचार केले आहेत तेच बहुतांशीं मराठीमध्यें उतरण्याचा प्रयत्न स्वानुभवाच्या साहाय्यानें प्रो.

फडके यांनीं प्रतिभासाधनांत केला आहे. जगाच्या वाङ्मयाच्या दृष्टीनें रा. फडके यांचा प्रयत्न जरी स्वतंत्र म्हणतां आला नाहीं; तरी मराठी वाङ्मया-पुरतें आणि केवळ मराठी वाचकांच्या दृष्टीनें पाहिलें असतां या प्रयत्नास मर्यादित स्वरूपानें स्वतंत्र म्हणतां येईल हें उघड आहे. वरील विधान केवळ ग्रंथांतील विचारापुरतेंच मर्यादित नसून मांडणी आणि भाषा या दुसऱ्या दोन अंगासंबंधानेंहि तें लागू आहे असें समजावें. प्रतिभा-साधनांतील मांडणी आणि त्यांतील भाषा हीं देखील सर्वस्वीं स्वतंत्र म्हणतां येत नाहींत. हें कसें हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

आपले ग्रंथ लिहितांना आपण ५।५० इंग्रजी ग्रंथांच्या परिशीलनाचा उपयोग केला आहे असें खुद्द रा. फडके यांचें म्हणणें आहे. तसें करणें रा. फडके यांस शक्य आहे यांत शंका नाहीं. ५।५० इंग्रजी ग्रंथांतील ज्ञान साररूपानें ग्रहण करून आपल्या स्वतंत्र प्रतिभेच्या रासायनिक भट्टींत त्याचें बाष्पीभवन करून त्यांत मराठी वाङ्मयाच्या उदाहरणांची आणि पदरच्या मसाल्याची भर घालून आपल्या कल्पनानालिकेच्या द्वारें सुंदर आणि स्वच्छ अशा अर्करूपानें तें त्यांनीं जगापुढें मांडलें आहे. मात्र त्यांत आतां मूळ ग्रंथाची ओळख मूळ स्वरूपांत व्हावयाची नाहीं असें जर कोणाचें म्हणणें असेल तर तें परीक्षणाअंतीं सिद्ध होण्याजोगें नाहीं. इंग्रजींतील इतर ग्रंथांची गोष्ट जरी सोडून दिली तरी क्लेटन हॅमिल्टन यांच्या Art of Fiction नामक एकाच ग्रंथांतील विचारकण रा. फडके यांच्या प्रतिभासाधनांत अशा स्वरूपानें चमकतांना आढळतात कीं, ते रा. फडके यांचे नसून मि. हॅमिल्टन यांचे आहेत ही गोष्ट उभयतांच्या परिचितांस सहज कळून येण्यासारखी आहे. या विवेचनाच्या शेवटीं परिशिष्टरूपानें अशा विचारकणांची म्हणजे उभयवर्ति स्थळांची यादी जोडलेली आहे. ती बारकाईनें पाहिली असतां वरील विधान कोणासहि पटवून घेतां येईल.

रा. फडके यांचें प्रतिभा-साधन हें समितीच्या मतें कोणत्याहि एका ग्रंथाचें सरळ, शुद्ध, व संपूर्ण असें भाषांतर नाहीं, किंवा तो तशा प्रका-रचा अनुवादहि नाहीं. उलट सर्वस्वीं स्वतंत्र असेंहि या ग्रंथाचें वर्णन करतां येत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां तपशीलांत शिरून या

ग्रंथाचे निरानिराळे भाग करून ते कसे सजविले आहेत त्याची तपासणी करणें प्राप्त आहे. २५५ पृष्ठांच्या या ग्रंथाचे दोन विभाग असून पहिल्या विभागाचीं ७५ पृष्ठें आणि दुसऱ्या विभागाचीं १८० पृष्ठें याप्रमाणें त्यांची वांटणी आहे. पाहिला विभाग ललितलेखनाचें मानसशास्त्र व दुसरा विभाग ललितलेखनाचें तंत्र असा आहे. म्हणजे प्रतिभा-साधन या ग्रंथाचें दुसरें नांव ठेवावयाचें झाल्यास ग्रंथकाराचे मताप्रमाणें ' ललितलेखन—मानसशास्त्र व तंत्र ' असें ठेवतां येईल. पैकीं पहिला भाग हा मानसशास्त्रविषयक ज्या अनेक विविध उपपत्ति पाश्चिमात्य विद्वानांनीं आपल्या ग्रंथांतून मांडल्या आहेत त्याच्या साहाय्यानें रा. फडके यांनीं उभारलेला आहे. मानसशास्त्रविषयक शास्त्रीय विवेचन या नात्यानें वरील ७५ पानें महत्त्वाचीं आहेत आणि बुद्धीचें उद्बोधन करणारीं आहेत. परंतु याच ७५ पानांत जलार्काची कल्पना व प्रो. ब्रॅन्डर मॅथ्युज यांचें एक अवतरणहि आलेलें आहे. ब्रॅन्डर मॅथ्युज यांचा उतारा प्रतिभासाधनांत पृष्ठ ७० वर आहे तो वास्तविक Art of Fiction या हॅमिल्टनच्या ग्रंथास ब्रॅन्डर मॅथ्युज यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंतील आहे. तथापि तो तसा निर्दिष्ट न करितां मोघमपणानें ब्रॅन्डर मॅथ्युज यांच्या लेखांतील एक उतारा असें त्याचें वर्णन दाखल झालेलें आहे हें संशयाला कारण होतें यांत शंका नाहीं. जलार्क व रासायनिक भट्टी यांचा पृष्ठ ५८ वरील उल्लेख आणि हॅमिल्टन यांच्या ग्रंथांतील पृष्ठ ८ वरील distilled life बद्दलचा उल्लेख हे परस्परसंबद्ध आहेत, हें रा. फडके यांसहि मान्य आहे. तथापि मानसशास्त्रविषक या ७५ पानांपेक्षां तंत्रविषयक पुढील १८० पानें हींच आक्षेपकांच्या टीकेचा प्रामुख्यानें विषय होऊन बसलीं आहेत आणि वास्तव त्यांचाच विचार अधिक विस्तारानें करणें समुचित होईल.

प्रतिभासाधनांतील दुसरा भाग म्हणजे ललितलेखनाचें तंत्र हा होय. यांत एकंदर सुमारें दहा प्रकरणें आहेत. Art of Fiction या ग्रंथांत एकंदर बारा प्रकरणें आहेत. रा. फडके यांचीं दहा व हॅमिल्टनचीं बारा प्रकरणें एकमेकांशीं ताडून पाहतां त्यांत पुष्कळ प्रकरणांचे विषय सारखेच आले आहेत आणि ज्या पक्षीं दोन्हीहि ग्रंथ साधारणतः एकाच विष-

यावर लिहिले आहेत त्यापक्षीं त्यांच्या प्रकरणांची विभागणीहि कांहीं अंशीं सारखीच होणें अपरिहार्य आहे. लघुकथा, कादंबरी, नाटक, भाषा-शैली इत्यादि विषय दोघांसहि विचारांत घ्यावे लागले आहेत. प्रकरणाच्या मथळ्यांच्या विभागणींतील साम्य याला कांहीं तेवढेंसें महत्त्व नाहीं. पुढें उभय ग्रंथांतील प्रकरणें समोरासमोर ठेवून वाचलीं असतां जर करितां आपणांस एकमेकांत विचाराच्या, भाषेच्या आणि मांडणीच्या क्रमाचें सादृश्य उपलब्ध झालें तर उभय ग्रंथांचा अन्योन्य संबंध बराच निकटचा आहे असें अनुमान आपण बांधणें न्यायाचें होईल. एखाद्या विषयाच्या विवेचनांत कांहीं भाग असा सर्व-सामान्य स्वरूपाचा असतो कीं कीं तो त्या विषयावरील सर्व प्रकारच्या ग्रंथांत आढळून येणें अपरिहार्य असतें आणि अर्थात् अशा स्थळीं उप-लब्ध होणारें विचारसाम्य याचा उगम किंवा मूल दोन्हीं शोधणें शक्य होत नाहीं. परंतु असलेंहि विचारसाम्य शब्दांच्या द्वारें आविष्कृत होत असतांना जर उभय ग्रंथांत आविष्करणानुसरणीमध्येंहि साम्यता अनुस्यूत असलेली दिसेल किंवा त्याच्या जोडीला भाषापद्धतीमध्येंहि नादसाम्य आढळून येईल तर उभय ग्रंथांतील नातें निकटचें ठरविण्यास विशेष अडचण पडणार नाहीं. क्लेटन हॅमिल्टनचा Art of Fiction आणि प्रतिभासाधन याचें सूक्ष्म अवलोकन केले असतां समितीच्या मतें असें निष्पन्न होतें कीं हॅमिल्टनच्या ग्रंथाची छाया प्रतिसाधनाच्या या उत्तर विभागांत कोठें पुसट तर कोठें स्पष्ट आणि कोठें दाट तर कोठें घनदाट अशी मधून मधून पसरलेली आहे. कोणचें एखादें वाक्य कोणच्या एखाद्या दुसऱ्या वाक्याचा अगदीं शब्दशः अनुवाद आहे अथवा शब्दशः भाषांतर आहे असें जरी समितीस म्हणतां येत नाहीं तरी समितीच्या मनाची अशी पक्की खात्री आहे कीं प्रतिभासाधन हा ग्रंथ लिहीत असतांना इतर कोणत्याहि अन्य इंग्रजी ग्रंथापेक्षां प्रो. फडके यांच्या समोर क्लेटन हॅमिल्टन Art of Fiction हाच ग्रंथ असला पाहिजे. नुसता असला पाहिजे एवढेंच नव्हे तर त्याचें सूक्ष्म अवलोकन करून आणि आपल्या स्वतःच्या अवलोकनाची त्यांत भर घालून पण क्लेटन हॅमिल्टनच्या विचारसरणीचा धागा बळकटपणानें हातीं धरून, प्रो. फडके यांनीं आपला मार्ग आक्र-

मिळा आहे. प्रो. फडके यांचे काम अर्थात् अत्यंत अवघड होतें. एका अत्यंत कठिण विषयावर एक अत्यंत सरस असा ग्रंथ निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा मनांत धरून प्रो. फडके झटत होते आणि समितीला सांगण्याला आनंद वाटतो प्रो. फडके यांनीं आपल्या कामांत पाहिल्या प्रतीचें यश संपादन केलें आहे. हेच विचार जर कोणी इंग्रजीमध्यें मांडले असते तर त्यांना विद्वान् मंडळींत कांहींच किंमत मिळाली नसती. परंतु साहित्यशास्त्रविषयक विचारांचा जेथें खडखडाट होता आणि आहे अशा मराठी साहित्यांत प्रो. फडके यानीं तेच विचार आपल्या सुंदर आणि ललित अशा पद्धतीनें व्यक्त केल्या कारणानें त्यांनीं मराठी वाचकांस आपलें ऋणाईत करून ठेविलें आहे यात शंका नाहीं. मात्र असें करतांना प्रो. फडके यांच्या मागें क्रेटन हॅमिल्टन यांची मूर्ति ठळकपणानें उभी आहे आणि ती त्यांस वारंवार उत्साहित करीत आहे आणि मार्गस्थ करीत आहे हेंहि क्रेटन हॅमिल्टन्च्या ग्रंथांची ओळख असणाऱ्या कोणाहि सूक्ष्मदर्शी पुरुषांच्या नजरेंत आल्यावांचून राहणार नाहीं. वस्तुतः प्रो. फडके यांना हें जें हॅमिल्टनचें साहाय्य मिळालें आहे त्यापासून त्यांस कोणत्याहि प्रकारचा कमीपणा येतो असें मानण्याचें कारण नाहीं. पण हें साहाय्य मिळालेंच नाहीं असें मानणें किंवा म्हणणें मात्र निःसंशय कमीपणा आणल्याशिवाय राहणार नाहीं. इतकेंच नव्हे तर म्हणण्याची अवश्यकता किंवा अपेक्षा असतां जर तसें म्हटलें नाहीं किंवा म्हणणार नाहीं आणि म्हणण्याचें कारण नाहीं असाच आग्रह धरला हें अधिकच वाईट आहे असें साफ लिहिणें आमचें कर्तव्य आहे.

क्रेटन् हॅमिल्टन्च्या Seen on the Stage या ग्रंथाचा जसा स्पष्ट निर्देश रा. फडके यांनीं केला आहे तसाच जर तो आर्ट ऑफ् फिक्शनचाहि केला असता तर कसला प्रत्यवाय होता !

असो ! हॅमिल्टनच्या ग्रंथाची छाया प्रतिभासाधनावर पडली आहे हें म्हणण्यास आधार काय हें आपणांस पाहिलें पाहिजे आणि यासाठीं वर्गीकृत परिशिष्ट रूपानें साम्यस्थलांची एक यादी अखेर जोडण्यांत आली आहे. त्यांतील कांहीं विशेष उदाहरणांचा खल येथें करूं. पहा! प्रतिभासाधन पान १७३, नाटक-प्रकरणीं प्रतिपादन चालू आहे आणि नाटकाची व्याख्या

केल्यावर नाटककार आणि नट यांजबद्दल विवेचन सुरू आहे. उघडा, हॅमिल्टनचें १६५ वें पान—त्यावरहि हाच विषय चालू असलेला दिसेल. व्याख्येचा विचार तूर्त बाजूस ठेवूं आणि Influence of the Actor या कलमाखालील विवेचन आपण वाचूं. या विवेचनांत पुष्कळदां नाटककारांना नटांचे गुणदोष लक्षांत घेऊन आपली कृति सजवावी लागते असें सांगत असतां पुष्ट्यर्थ म्हणून मि. हॅमिल्टन यांनीं सारडू या फ्रेंच नाटककाराचें लाटोस्का हें पात्र, तसेंच मोलिएर याचें सेलिमन हें पात्र व शेक्सपियर याचें हॅम्लेट हें पात्र हीं तीन पात्रें उदाहरणादाखल घेऊन अनुक्रमें सारा बर्नहार्ट, मॅडमॉयझेल मोलियेर आणि रिचर्ड बरबाज यांजकडील भूमिका या त्या त्या भूमिका करणाऱ्या सदरील तीन नटांच्या शरीरस्वभावादि विशेषांच्या अनुरोधानें कशा बसविण्यात आल्या आहेत, हें सांगितलें आहे. अगदीं तींच उदाहरणें रा. फडके यांनीं दिलीं आहेत. अर्थात् आपल्या इकडील मराठी उदाहरणांची त्यामध्यें त्यांनीं भर घातली आहे. परंतु हॅमिल्टननें बरबाजच्या उदाहरणाचा जरा थोडा अधिक विस्तार केला आहे आणि त्यासाठीं हॅम्लेटमधील एक वाक्य उतरून घेतलें आहे; तर रा. फडके यांनीं त्याच उदाहरणाचा विस्तार करून तेंच वाक्य त्याच प्रसंगीं उतरून घेतलें आहे. हें उदाहरणसाम्य व क्रमसाम्य पाहतां कोणाहि निःपक्षपाती माणसास निःसंशय असें म्हणावें लागेल कीं, क्लेटन हॅमिल्टनच्या १६५ व्या पानांतील मजकूर आपल्या अगदीं समोर ठेवून प्रतिभासाधनांतील १७३ व्या पानावरील मजकूर तयार झाला आहे. त्यामध्यें कांहीं अधिक भर आहे तर कांहीं अर्थात् गाळलेलेंहि आहे म्हणजे जरा विवेचक दृष्टीनें काम केलेलें आहे, तरी हॅमिल्टनची छाया या पानावर अगदीं स्पष्ट खात्रीपूर्वक ओळख पटण्याइतकी, उठलेली आहे, यांत तिळमात्र संदेह नाहीं. कांहींशी तीच स्थिति एक एक पान मागें जाऊन जर आपण तपास केला तर तेथेंहि आपणास आढळून येईल. " A drama is in essence a story devised to be presented by actors on a stage before an audience " अशा प्रकारची नाटकाची व्याख्या मि. हॅमिल्टन यांच्या ग्रंथांत आढळते. हें वाक्य देऊन मि. हॅमिल्टन पुढें म्हणतात—" The dramatist

therefore works ever under the sway of three influences to which the novelist is not submitted viz. the temperament of the actors by whom his plays are to be performed; the physical conditions of the theatre in which they are to be produced and the psychological nature of the audience before which they are to be presented." Page 164. आतां प्रतिभा-साधन पान १७२ पहा. "नटांचें अभिनयनैपुण्य, रंगभूमीचा सांप्रदाय आणि प्रेक्षकांची मनोभूमिका या तिहींच्या क्रियाप्रतिक्रियेची मदत घेऊन लेखकाला रंगदेवता प्रसन्न करावयाची असते" असें सांगून हीं बंधनें सूचित करणारी 'नाटकाची एक व्याख्याच आपण या ठिकाणीं करूं' असें म्हणून "रंगभूमीवर नटाकडून अभिनयाच्या व भाषणाच्या द्वारें लोकसमुदायास सांगितल्या जाणाऱ्या कथा म्हणजे नाटक" असें रा फडके यांनीं ठरविलें आहे. हॅमिल्टननें व्याख्या अगोदर देऊन तीन बंधनांचा निर्देश केला आहे. फडके यांनीं तींच बंधनें त्याच क्रमानें आधीं निर्दिष्ट करून मागाहून तशीच व्याख्या दिली आहे. नाटकाची व्याख्या निरनिराळ्या टीकाग्रंथांत फारशी भिन्न आढळते असें नाहीं. पण त्यांतील शब्दरचना कांहीं कमीअधिक मानानें भिन्न असते. ब्रॅन्डर मॅथ्युज किंवा शेलिंग किंवा आणखी कोणी अन्य टीकाकार यांनीं दिलेली नाटकाची व्याख्या आणि हॅमिल्टन यानें दिलेली नाटकाची व्याख्या यांत जर शेंकडा ८० टक्के साम्य असलें तर क्लेटन हॅमिल्टनची व्याख्या आणि फडके यांची व्याख्या यांत ९० टक्के साम्य आहे आणि हॅमिल्टनची व्याख्या पाहूनच आणि हॅमिल्टनचा मागोवा घेतघेतच फडके यांनीं आपली व्याख्या सादर केली आहे, यांत समितीस तर कसलाहि संशय नाहीं. नुसती व्याख्याच सुटी करावी तर गोष्ट वेगळी. पण हॅमिल्टनच्या ग्रंथांत व्याख्येला चिकटून असलेल्या या तीन मर्यादा आणि त्या मर्यादांचा जो क्रम आलेला आहे तोच जेव्हां फडके यांच्या पुस्तकांत त्याच कलमांत आणि तसाच उतरलेला दिसतो तेव्हां त्याचें अनमान एकच आहे आणि तें म्हणजे हॅमिल्टनवरून रा. फडके यांनीं उतरून घेतलें अथवा

फडक्यांच्यावरून हॅमिल्टननें उतरून घेतलें. पैकीं दुसरा पक्ष उघड उघड असंभवनीय असल्यामुळें पहिलाच पक्ष सिद्धांत म्हणून ग्राह्य समजावा लागतो.

प्रत्येक कथेला आरंभ, मध्य आणिं अंत असे तीन विभाग असतात, आणि हा सिद्धांत सांगत असतांना ॲरिस्टॉटलच्या मनासमोर ‘complication, major knot and explication’ हे किंवा असे तीन शब्द निःसंशय असले पाहिजेत असें हॅमिल्टनचें: म्हणणें आहे. (पृष्ठ ६९) याच तीन शब्दांच्या ऐवजीं इंग्रजीमध्यें अन्यत्र ‘situtation, climax व ending अशी शब्दयोजना केलेली आढळते. या तिन्ही कल्पना अथवा कथानकांच्या अवस्था स्पष्ट करण्यासाठीं अनुक्रमें गुंतागुंत, निरगांठ आणि उकल असे तीन नवे शब्द रा. फडके यांनीं वापरले आहेत. complication, major and explication या शब्दांचें शब्दशः कोणी मराठींत भाषांतर केल्यास तो हजार हिश्श्याने गुंतागुंत, निरगांठ अथवा मोठी गांठ आणि उकल अथवा सोडवणूक अशाच शब्दांनीं करील. परंतु “situation, climax and ending” या शब्दांचें भाषांतर करण्याचें त्यास कारण पडल्यास तो प्रसंग, परिसीमा आणि पर्यवसान अशा प्रकारचे शब्द योजून करील. निरगांठ किंवा सुरगांठ असल्या प्रकारच्या गाठीचे प्रकार त्यास आठवणार नाहींत. गांठीच्या गुंतागुंतीची ही उकल समजण्यास complication, major knot व explication हे मूळ शब्दच ध्यानांत यावयास पाहिजेत. तात्पर्य इतकेंच कीं गुंतागुंत, निरगांठ व उकल हे रा. फडके यांनीं वापरलेले शब्द complication, major knot व explication या शब्दांचीं **शुद्ध भाषांतरें आहेत** आणि तीं हॅमिल्टनच्या शब्दांवरूनच सुचलीं आहेत; ततसमानार्थक अशा “situation, climax and ending” या शब्दांवरून त्यास सुचले नाहींत याविषयीं लवमात्र संदेह सामितसि वाटत नाहीं. आणि complication, major knot व explication हे शब्द तर क्लेटन-हॅमिल्टन यांनीं वापरले आहेत. (पृ. ६९) अर्थात् हॅमिल्टनच्या पुस्तकावरून रा. फडके यांनीं हे महत्त्वाचे शब्द भाषांतररूपानें मराठींत

आणले आणि मूळ इंग्रजी शब्द पाहिले असतां मग या मराठी भाषांतरांत तितकें कुशलत्वहि कर्त्याच्या प्रदरीं बांधण्याचें कांहीं कारण नाहीं इतकें तें भाषांतर उघड आणि सरळ होतें. अशा स्थितींत क्रेटनहॅमिल्टनचा नामोच्चारहि न करिता किंवा गुंतागुंत, निरगांठ आणि उकल यांचे औरस पूर्वज जे complication, major knot and explication यांचीं नांवें वगळून त्यांच्याच जातीचे दुसरे situation, climax and ending हे शब्द त्या जागीं दाखल करणें म्हणजे औरस आईबापांचीं नांवें बदलून दत्तक घरच्या आईबापांचीं नांवें पुढें करण्यासारखें होय. मूळ घरची चौकशी केली असतां ही झाकाझाक अगदीं असमर्थनीय ठरेल असें कोणासहि वाटेल. आतां जरा अगदीं शेवटीं जाऊं. [पान २४७] भाषाशैलीचें प्रकरण चालू आहे. Le style est la hommeme me (The style is the man) ही सुप्रसिद्ध फ्रेंच म्हण प्रो. फडके यांनीं दिली आहे. जसें प्रतिभासाधनांत भाषाशैली हे प्रकरण विवेचनाच्या दृष्टीनें शेवटचें आहे, त्याचप्रमाणें क्रेटनहॅमिल्टनच्या पुस्तकांतहि Factor of style हेंच शेवटचें प्रकरण आहे. आणि ज्याप्रमाणें भाषाशैली या प्रकरणाची सूचना त्याच्या लगतच्या पूर्वीच्या लघुकथा प्रकरणाच्या अखेरीस रा. फडके यांनीं केली आहे, त्याचप्रमाणें क्रेटन हॅमिल्टन याच्या Factor of style या प्रकरणाची सूचनाहि त्याच्या लगतच्याच पूर्वीच्या Structure of the Short Story या प्रकरणाच्या अखेरीसच झालेली आहे. मांडणीचें हें विलक्षण साम्य आपली जन्मकथा अगदीं स्पष्टपणें सांगत आहे. या Factor of style या प्रकरणांत हॅमिल्टनसाहेब यांनीं पृष्ठ २०८ वर वरील फ्रेंच म्हण उद्धृत केली आहे. साधारणपणें या फ्रेंच म्हणीचें इंग्रजी रूपांतर 'The style is the man.' असें प्रसिद्ध असून सर्वत्र इंग्रजी जाणणारे सुशिक्षित त्याचाच सर्रास अनुवाद करतात. मूळ फ्रेंच म्हणीचा अनुवाद कोणी सहसा करीत नाहीं. मांडणीचें विलक्षण साम्य ज्या प्रकरणांत उतरल्याचें आतांच वर सांगितलें आहे त्याच प्रकरणांत तीच फ्रेंच म्हण इंग्रजी रूपांत न सुचतां फ्रेंच रूपांत रा. फडके यांनीं उतरली तर असें स्वच्छ म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे कीं, हॅमिल्टन यांच्याच ग्रंथांतून इकडे आणण्यांत आलें

आहे ? आतां हॅमिल्टनचाच ग्रंथ जर आदर्श म्हणून रा. फडके यांनीं ठेवला असेल तर या फ्रेंच म्हणीचेंच प्रतिबिंब त्यांत यावें यांत तरी आश्चर्य काय ?

प्रतिभासाधन यांतील प्रतिभा हा शब्द वाचतांच कोणाहि प्रौर्वात्य वाङ्मय वाचणाऱ्या गृहस्थाला काव्याची आठवण झाल्याशिवाय एक निमिष देखील लोटतां येणार नाहीं. परंतु रा. फडके यांच्या प्रतिभा-साधनांत काव्याचा विचार अजबिात गाळलेला आहे. नेमका तोच प्रकार क्लेटन हॅमिल्टन याचाहि झाला आहे. काव्याची आपल्याला आठवण असल्याबद्दल आणि आपल्या विवेचनाला काव्याच्या स्वतंत्र विवेचनाची आवश्यकता आपणास वाटत नसल्यानें काव्य असें नांव देऊन निराळें विवेचन करणें आपणांस जरूर वाटत नाहीं किंबहुना Fiction याची व्याख्या आपण अतिशय व्यापक अशी समजतों असें समर्थन मि. हॅमिल्टन यांनीं केलें आहे. इकडे रा. फडके यांचें या प्रकरणीं समर्थन असें आहे कीं "माझा कवितेचा व्यासंग नाहीं व स्वतंत्र बुद्धीनें विचार केल्यावांचून लिहिणें मजला रुचलें नाहीं म्हणूनच तो विषय मी प्रतिभा-साधनांत गाळला आहे, हें कोणी विसरूं नये." याच्याच पूर्वीचें रा. फडके यांचें वाक्य असें आहे "प्रतिभासाधन लिहिण्याचे कामीं माझ्या अनेक वर्षांच्या चिंतनानें व व्यासंगानें तयार झालेले स्वतंत्र विचारच मी सर्वत्र उपयोगांत आणले आहेत." या दोन्ही विधानांतील मतलब ग्राह्य होऊं शकला असता तर ती गोष्ट समितीस फारच अभिमानाची वाटली असती. परंतु दुर्दैवानें प्रतिभासाधन ग्रंथांत अन्यत्र कोठें आढळत नाहींत असले स्वतंत्र विचार समितीस आढळून आले नाहींत. प्रो. फडके यांनींहि एखादा तसा स्वतंत्र विचाराचा नमुना किंवा उदाहरण आपल्या विस्तृत समर्थनांत दाखल केलें नाहीं ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय. काव्याबद्दल आपला स्वतंत्र व्यासंग नाहीं असें प्रो. फडके म्हणतात. परंतु प्रो. फडके हे अधूनमधून आपल्या कविता प्रसिद्ध करतांना आढळ-तात आणि नाट्यवाङ्मयाचा विचार करणारा गृहस्थ काव्याच्या विचारापासून सर्वथा अलिप्त राहणें आमच्या मतें तरी अत्यंत अजागळ गणलें जाईल. तसेंच प्रतिभेचा विचार करतांना ज्या काव्याची ती केवळ

प्राणभूत शक्ति आहे त्याचा सर्वस्वी विचार सोडून देणें हें मोठें अन्यायाचें ठरणार असल्यामुळें रा. फडके यांचा दुसरा मुद्दाहि समितीस पटवून घेतां आला नाहीं असें मोठ्या कष्टानें नमूद करणें भाग आहे. मला एक हात नाहीं किंवा मला एक पाय नाहीं किंवा माझा एक डोळा गेला आहे, सबब मला वर म्हणून पत्करा असें कोणी अभिमानानें म्हणूं लागल्यास, अभिमान किंवा प्रांजलपणा या दोन्ही दृष्टींनीं त्याच्या म्हणण्यास कोणीहि सहानुभूति दर्शवूं शकणार नाहीं. कॅप्टन हॅमिल्टन यांनीं काव्याची मीमांसा गाळली आहे किंवा केली नाहीं. रा. फडके यांनीं तोच मार्ग स्वीकारला आहे. हें उभयतांचे वर्तनसाम्य उभयतांच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाचें फळ म्हणावें असें कोणी अपेक्षिल्यास ती अपेक्षा पुरी करणें कोणाहि समंजस समितीस शक्य नाहीं.

रा. फडके यांचें एक म्हणणें असें आहे कीं, आपला ग्रंथ गीतारहस्य, नीतिशास्त्र–प्रवेश किंवा राज्यशास्त्र या ग्रंथांच्या वर्गांतील आहे. विचारा-अंतीं वरील तिन्ही ग्रंथ एकाच वर्गात दाखल करणें जड जाईल. गीता-रहस्य हा एक अत्यंत विस्तृत विवेचनपर, सांगोपांग परामर्श घेणारा असा ग्रंथ असून त्यांत लोकमान्यांनीं कर्मप्रधान ज्ञानभक्तियोगाची स्थापना केली आहे आणि पूर्वसूरींच्या पेक्षां भिन्न असा आपला नवाच संप्रदाय उपक्रमोपसंहारादि मीमांसाशास्त्रांतील परीक्षणपद्धतीचा अवलंब करून प्रस्थापित केला आहे. शिवाय गीतारहस्यकारांनीं जागोजाग आधारांचे उल्लेख सविस्तर दिले आहेत हें विसरतां कामा नये. नीतिशास्त्रप्रवेश, राज्यशास्त्र किंवा प्रतिभा-साधन यांपैकीं कोणताहि ग्रंथ या स्वरूपाचा नाहीं. अर्थात् गीतारहस्याची कोटी अगदीं स्वतंत्र मानली पाहिजे. नीतिशास्त्रप्रवेश आणि राज्यशास्त्र हे दोन आणि प्रतिभा-साधन असे तिन्ही ग्रंथ वजनदारीच्या दृष्टीनें पाहतां कांहीं अंशीं स्थूल मानानें एका वर्गात बसवितां येतील. पैकीं राज्यशास्त्रकर्त्यांनीं आपल्या ग्रंथांत कांहीं संदर्भग्रंथांची यादी जोडलीच आहे आणि नीतिशास्त्रप्रवेशकर्ते यांनीं आपण स्वतंत्र विचारप्रवर्तक असा हा ग्रंथ लिहिला अशी प्रतिज्ञा केलेली नाहीं. मराठी वाचकांच्या दृष्टीनें नीतिशास्त्रप्रवेश व राज्यशास्त्र

यांच्या कर्त्यांनीं फारच उत्तम रचना करून प्रतिभासाधनाच्या कर्त्या-प्रमाणेंच त्यांस आपले ऋणाइत केलें आहे यांत शंका नाहीं. आपले स्वतंत्र विचार व आपलें स्वतःचें अनेक वर्षांचें मनन व चिंतन यांचाहि या ग्रंथकारांनीं उपयोग केला असला पाहिजे, किंबहुना तसें न करणें त्यास अपरिहार्य होतें याविषयीं कोणासच शंका घेण्याचें कारण नाहीं; पण म्हणून पुष्कळ चांगल्या कल्पना, पुष्कळ चांगली मांडणी आणि पुष्कळ सरस स्थळें या दोन्ही ग्रंथांत दाखवितां आलीं तरी तेवढ्यावरून ते ते ग्रंथकार जगाच्या वाङ्मयांत स्वतंत्र विचा-रांची भर घालणारे ठरत नाहींत. स्वतंत्रप्राय म्हणून मागें जो वर्ग सांगि-तला त्या वर्गांत मात्र या दोन्ही ग्रंथांची गणना करितां येईल. एवढेंच काय, त्या वर्गांत त्यास अगदीं पहिल्या ओळींत स्थळ मिळेल हें उघड आहे. प्रतिभासाधन हा ग्रंथहि स्वतंत्रप्राय वर्गांत आम्हीं दाखल केलाच आहे. तथापि नीतिशास्त्रप्रवेश आणि राज्यशास्त्र या दोन्ही ग्रंथांपेक्षांहि त्याचा अनुक्रम आमच्या मतें खालचाच लागेल. परंतु राज्यशास्त्र, किंवा नीतिशास्त्रप्रवेश यांच्या जातीचा प्रतिभासाधन हा ग्रंथ आहे, एवढेंच जर रा. फडके यांचें म्हणणें असेल तर काव्याचें विवेचन आपण कां केलें नाहीं तें सांगण्यापूर्वी प्रतिसाधनांत सर्वत्र स्वतंत्रच विचार भरले आहेत अशी जी व्यापक प्रतिज्ञा रा. फडके यांनीं केली आहे ती अतिव्यास आहे असें म्हणणें भाग आहे. असो !

सामान्य जनतेपुढें आज इतके दिवस प्रतिभासाधनाविषयीं जी खडाजंगी चालू होती, आणि जिचा स्वबुद्धीनें निर्णय करून व जनसमाजास आपला निर्णय सादर करण्यासाठीं जिचा अवतार झाला त्या समितीचें म्हणणें वाचकवर्गास यथामति सादर केलें आहे, आणि त्याचा थोडाबहुत तरी उपयोग सर्वांस होईल असा समितीस भरंवसा आहे. समितीच्या मतें उशीर झाला असला तरी या प्रकरणींचा आपला निर्णय प्रगट करणें हें एकंदरींत उपकारक होईल. समिती कोणाचीहि पक्षपाती नाहीं. समितीस कोणाचा हेवादावा नाहीं. समिती पक्षपाती असेल तर ती सत्याची पक्षपाती आहे. प्रो. फडके यांचें यश सत्यास धरून जेवढें वृद्धिंगत होईल तेवढा समितीस मनापासून आनंदच होईल. मराठी वाङ्मयांत प्रो.

फडके यांच्यासारखे बुद्धिमान आणि चतुर व यशस्वी लेखक जेवढे निर्माण होतील तेवढा त्या वाङ्मयाचा भाग्योदय होईल अशी समितीची ठाम समजूत आहे. प्रतिभासाधन हें प्रो. फडके यांचें गोंडस ग्रंथापत्य महाराष्ट्र मोठ्या प्रेमानें, आशेनें आणि अभिमानानें स्वीकारील याविषयीं आम्हांस यत्किंचित् संदेह नाहीं आणि खरोखरी ग्रंथाच्या सुंदरपणाविषयीं अथवा उपयुक्ततेविषयीं कसलाच वाद नव्हता. वाद, या ग्रंथांत कांहीं स्थळीं प्रो. फडके यांनीं क्लेटन हॅमिल्टनच्या ग्रंथांतील विचार उतरून घेतले असून त्या ठिकाणीं क्लेटन हॅमिल्टन याचा उल्लेख केला नाहीं, आणि तो करावयास पाहिजे असून केला नाहीं, मुद्दाम गाळण्यासारखा तो गाळला अशा प्रकारचाच जो आक्षेप मुख्यत: प्रमाणें देऊन पुढें मांडण्यांत आला होता त्यावरून निघाला होता. आपल्या ग्रंथाला रा. फडके यांनीं प्रस्तावनाहि दिली नाहीं आणि आधारभूत ग्रंथांची यादीहि जोडली नाहीं; इतकेंच नव्हे तर ग्रंथाची रचना करीत असतांना जागोजागीं वाचकाशीं बोलण्यास कदाचित् सोईचें पडावें म्हणून असेल, परंतु ' मी असें म्हणतों, ' ' माझें असें म्हणणें आहे, ' मी हे शब्द वापरले आहेत, ' ' आतांच मीं हें सांगितलें ' अशाप्रकारें मीकार-युक्त जें बोलणें केलें आहे तो मीकार मनांत वाटणाऱ्या स्वातंत्र्याचा जणूं काय हुंकारच आहे असें भासतें. आतां लिहिलेल्या विचारांच्या मागें पार्श्वभागीं कोणीहि नाहीं, ती सर्व विचारसंपत्ति प्रो. फडके यांच्या खास मालकीच्या खाणीं पैदा झालेली आहे अशी अनभिज्ञ वाचकांची सहज समजूत होऊन जाईल. न जाणो प्रो. फडके यांस तें इष्टहि वाटत असेल. पण तसें कशाला ? आपल्याच खास मालकीच्या विचारांच्या खाणींतील संपदा आपण लोकांसमोर उधळीत आहों असेंच प्रो. फडके यांनीं हळूच नव्हे तर टिचून सांगितलें आहे; एकवार नव्हे तर अनेकवार सांगितलें आहे; आणि यामुळें ज्या कोणाला प्रतिभासाधनांतील विचार-संपदा इंग्रजींतील विचारसंपदेहून कोणच्याहि प्रकारची निराळी आढळली नाहीं, त्यांचे ठायीं प्रो. फडके किंवा आपण कोणीतरी चुकत आहोंत असा संशय दृढावत जाणें साहजिकच होतें. अशा स्थितींत रा. कानिटकर व कुलकर्णी यांनीं उतावळीच्या आवेशानें ' बोला, तुम्हीं हें सर्व चोरून

आगलें आहे कीं नाहीं बोला ' असें केवळ खड्याच नव्हे तर चढ्या सुरांतहि जाहीर रीतीनें विचारलें हें एक प्रकारें साहजिक झालें.

अशा वेळीं सत्य असत्याचा निर्णय करण्यास इंग्रजी किंवा मराठी या उभयविध वाङ्मयाचे ज्ञाते समर्थ असल्याविषयीं मनांत भरंवसा बाळगून स्तब्ध राहणें अथवा जेथून जें घेतलें असेल तें तसें घेतल्याबद्दल माहिती देणें हे दोन् सरळ मार्ग पसंत न पडून रा. फडके यांनीं आक्षेपकांच्या इतक्याच मोठ्या आवाजानें आणि आवेशानें प्रत्युत्तर दिलें आणि तेथें मागें सांगितलेला हुंकार प्रगट झाला. हा हुंकारच वाद भडकण्यास आणि त्याची ज्वाला घटकाभर सर्व मराठी साहित्यक्षेत्रांत सर्वत्र पसरण्यास कारण झाला आहे असे समितीस वाटतें. वर्तमानपत्रांत सुलभतेनें स्थळ मिळण्याची सोय झाल्यामुळें या वादाचा आणि वणव्याप्रमाणें त्वरेनें फुगविला गेला आणि मग इच्छा नसतांनाहि आणि कारण नसतांनाहि ' बलादिव नियोजितः ' असा प्रकार होऊन समितीची स्थापना झाली आणि त्याचें फल या निर्णयाचे रूपानें सादर होत आहे. खरोखरीच प्रो. फडके यांनीं आधारभूत ग्रंथांची यादी किंवा प्रस्तावना ही अजागलस्तनवत् निरर्थक म्हणून काढून टाकली असती तरी कांहीं विशेष बिघडलें असतें असें नाहीं. फक्त कोठें तरी ठळकपणानें पुढील एक वाक्य अथवा वाक्यांश त्यांनीं दाखल करावयास पाहिजे होताः—" क्रेटन हॅमिल्टनप्रभृति " अनेक इंग्रजी ग्रंथांच्या साहाय्यानें तयार केलेला. "

---

# ‘प्रतिभासाधन’ व ‘आर्ट ऑफ फिक्शन’ या ग्रंथांतील साम्यस्थळें

## परिशिष्ट (अ) १—भाषांतरित किंवा अनुवादित उतारे.

| प्र. सा. पृष्ठे | प्र. सा. मधील उतारे. | शेरा | आ.फि. पृष्ठें | आ. फि. मधील उतारे. |
|---|---|---|---|---|
| पृ. ५५ | ‘सत्य, प्रत्यक्ष व कल्पित यांचे अन्योन्य संबंध’ इत्यादि | मोकळा अनुवाद. | पृ. ४ | ‘It is only in the vocabulary’ etc. |
| पृ. ५७ | ‘प्रत्यक्षाचा शोध,’ ‘सत्याचा निर्णय,’ व ‘कल्पिताची मांडणी.’ | स्पष्ट भाषांतर | पृ. ६ | ‘Scientific discovery,’ philosophic understanding and ‘artistic expression.’ |
| पृ. ५६ | ‘मनुष्य प्रथम विविध वस्तूंचा इंद्रियांच्या साहाय्याने शोध करीत असतो,....निर्णय करीत असतो, ...सिद्धांत लोकांच्या मनावर ठसवीत असतो.’ | अनुवाद. | पृ. ६ | ‘The necessary triple process.’—हा परिच्छेद’ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पृ. ८७ | 'अनेक प्रसंगांची चतुराईची मांडणी किंवा गुंफण म्हणजे ललितकथा होय.' | अनुवाद | पृ. ४६ | A narrative is a representaion of a series of events.' |
| पृ. ८८ | वरील व्याख्या व तींतील शब्दाचे विवरण.–'गुंफण,' 'अनुक्रम,' ' कार्यकारणसंबंध,' इत्यादि. | ,, | पृ. ४६–४८ | 'Series' and 'succession.' 'Life is chronological, Art is logical.' |
| पृ. १४२ | 'गुंतागुंत,' निरगांठ,' व 'उकल.' | स्पष्ट भाषांतर. | पृ. ६९ | 'Complication,' Major Knot' and 'Explication.' |
| पृ. २४९ | 'भाषाशैली शिकवितां येणार नाहीं, पण शिकतां मात्र येईल.' | भाषांतर | पृ. २०७ | 'Although it is true that in a certain sense it may be learned, it is also true that it cannot be taught.' |
| पृ. २४० | भाषेचा अर्थ व ध्वनि या दोन अंगांची परस्पर अनुरक्ति म्हणजेच शैली.' | अनुवाद. | पृ. २०९ | 'This co-ordination of the two appeals is the origin and the essence of the quality of style.' |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पृ. २३८ | 'भाषेच्या शैलीचा गुण बुद्धीस प्रतीत होणारा नसून भावनेस कळणारा आहे.' | भाषांतर. | पृ. २०८ | 'Style is a matter of feeling rather than of intellect.' |
| पृ. १७२ | 'रंगभूमीवर नटांकडून अभिनयाच्या व भाषणाच्या द्वारें लोकसमुदायास सांगितली जाणारी कथा म्हणजे नाटक.' | अनुवाद व विस्तृत विवरण. | पृ. १६४ | 'A drama is in essence a story devised to be presented by actors on a stage before an audience.' |
| पृ. १८०–८४ | 'सामुदायिक मन' व त्यावरून निष्पन्न होणारीं नाट्यतत्त्वें. | | पृ.१६८-१६९ | 'Since the mind of the multitude.' etc.-सबंध प्यारा. |
| पृ. २३९ | 'भाषेचा वाचकावर जो परिणाम होतो तो दुहरी असतो.' | अनुवाद | पृ. २०८ | 'The twofold appeal of language'-हा परिच्छेद. |
| पृ. २४३ | 'प्रत्येक सुंदर वाक्याला एक प्रकारची लय असते.' इत्यादि | ,, | पृ. २१२ | 'Every normal sentence contains a knot or hitch etc. |
| पृ. १३७ | कथानकाची अखेरी कागदावर लिहिली जाते सगळ्याच्या शेवटीं; परंतु ती लेखकाच्या मनांत तयार असावयास पाहिजे सगळ्यांच्या आधीं, इत्यादि. | ,, | पृ. ६२ | 'His narrative, as a matter of construction, must be finished, before, as a matter of writing, it is begun,' etc. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पृ. २२० | 'शक्य तितक्या परिणामकारक रीतीनें आणि शक्य तेवढ्या कमी पात्र प्रसंगाच्या माध्यानें सांगितलेली एकच गोष्ट म्हणजे लघुकथा.' | अनुवाद | पृ. १५७ | 'The aim of a short story is to produce a single narrative effect with the greatest economy of means that is consistent with the utmost emphasis. |

## परिशिष्ट (अ) २....सामान्य मुद्दे.

| प्र. सा. पृष्ठें | प्र. सा. मधील मुद्दे | शेरा. | आ. फि. पृष्ठें. | आ. फि. मधील मुद्दे. |
|---|---|---|---|---|
| पृ. ५८ | 'रासायनिक भट्टी' ची कल्पना. | फक्त आकृति फडक्यांची | पृ. ८ | 'A figure from chemical science.' |
| पृ. १७३ | 'नाटककाराच्या कृतीचें पहिलें कोंदण म्हणजे नट.' | मुद्दा घेतला, थोडे विवेचनही. | पृ. १६५ | 'Influence of the Actor.' |
| पृ. १७४ | दुसरें कोंदण–'रंगभूमीची स्थिति.' | मुद्दा घेतला. | पृ. १६६ | 'Influence of the Theatre.' |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पृ. १७६ | तिसरें कोंदण–'लोकसमुदाय.' | मुद्दा घेतला. | प. १६७ | 'Influence of the Audience.' |
| पृ. १७७ | नाट्यास समरप्रसंगाची आवश्यकता. | ,, | पृ. १६८ | 'No struggle, no drama.' |
| पृ.२२०-२२१ | 'एकच गोष्ट'व एकच एक संस्कार.' | ,, | पृ. १७८ | 'Single narrative effect.' |
| पृ. २२२ | 'मितव्यय.' | ,, | पृ. १७९ | 'Economy of means.' |
| पृ. १३० | प्रसंगांतील 'एकसूत्रता' | ,, | पृ. ६१ | 'Unity in Narrative.' |
| १३२ | 'साम्यविरोधधर्मानुसार प्रसंगांची निवड.' | ,, | पृ. ६४-६५ | 'Positive and Negative Events.' |
| पृ. १५६ | पार्श्वभूमीच्या निर्मितींत चित्रकलेशीं साम्य. | ,, | पृ. ९९ | 'Evolution of Background in the History of Painting.' |
| पृ. १६० | वातावरणाचा भावनांशीं साम्यविरोधभाव. | ,, | पृ.१०४-१०६ | Emotional Harmony & Contrast in Setting. |
| पृ. ९४-९५ | 'स्वैर कल्पना' व 'तर्काचा खेळ.' | ,, | पृ. ५२ | Developing the sense of Narrative.' |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पृ. १४६ | ‘ साक्षात् पद्धति ’ | संदर्भ बदलून मुद्दा घेतला; पण शब्द योजना कायम राखली. | पृ. ८४ | ‘Direct Delineation.’ |
| पृ १३८-१३९ | ‘ विस्मय ’ | मुद्दा घेतला. | पृ.१५१-५२ | ‘Emphasis by Surprise.’ |
| पृ. १३४ | ‘ उत्कंठा ’ | ,, | पृ. १५३ | ‘Emphasis by Suspense.’ |

# परिशिष्ट (अ) ३—सामान्य उदाहरणें.

| प्र. सा. पुष्टें. | प्र. सा. मधील उदाहरणें | शेरा. | आ. फि. पुष्टें | आ. फि. मधील उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| पृ. १७३ | सार्डूचें ला स्टोका हें स्त्रीपात्र व त्याची भूमिका करणारी नटी सॅरा बर्नहार्ट. | एकच उदाहरण. | पृ. १६५ | Sardou's La Tosca and Sarah Bernhardt. |
| पृ. १७३ | मोलियरचें सेलिमेन हें पात्र व त्याची भूमिका करणारी नटी मोलियर. | ,, | पृ. १६५ | Moliere's Celimene and Mlle. Moliere. |
| पृ. १७३ | शेक्सपियरचें हॅम्लेट हें पात्र व त्याची भूमिका करणारा नट रिचर्ड बुरबाज. | ,, | पृ. १६५ | Shakespear's Hamlet and Richard Burbage. |
| पृ. ९४ | धांवत धांवत ट्रॅम गांठणारा इसम. | सदृश उदाहरण | पृ. ५३ | A person in a streetcar. |

# परिशिष्ट (अ) ४—सामान्य अवतरणें.

| प्र. सा. पुष्ठें. | प्र. सा. मधील अवतरणें. | शेरा. | आ.फि. पुष्ठें | आ. फि. मधील उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| पृ. ७० | 'It is not too much to say...' etc. | ब्रॅडर मॅथ्यूजनें लिहिलेल्या आ. फि. च्या प्रस्तावनेमधील अवतरण. | प्रस्तावना पृ. २१-२ | 'It is not too much to say...' etc. |
| पृ. २२६ | 'Make another end to it ?...'etc. | स्टीव्हन्सननें कॉल्व्हिनला लिहिलेल्या पत्रांतील हॅमिल्टननें घेतलेलें अवतरण. | पृ. १७९ | 'Make another end to it ?...' etc. |
| पृ. १४७ | Le Style est de l'homme me'me.' | हॅमिल्टननें। उल्लेखिलेलें बफनचें वचन. | पृ. २०८ | 'Le style est de l'homme me'me.' |

